सेवट — इति श्री भारते वनपर्वणी ॥ पुढां परिसोत विचक्षणी ॥
मुक्तेश्वर कवीची वाणी ॥ व्यासाश्रयें चमके ॥ ८९ ॥

माहिती— वोवी बद्ध. ८९ वोव्या. ग्रंथाचे पानें कितियेक तुटले आहेत.

२३४४ भारत संमंधीक कथा अनाम कृत

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. १५

बर्नेल. नं. — पानें ५

अनु. क्र. अं. ११९ ग्रंथसंख्या ११०

आरंभ — तवें ऋषी ह्मणती युधिष्टिरा ॥ यज्ञभूमी शोधावी अविधारा ॥
मग जाउनी जान्हवी तीरा ॥ यज्ञ भूमिका शोधिली ॥ १ ॥

सेवट — जो योग भोक्ता श्री अनंत ॥ तो प्रत्यक्ष येथें नांदत ॥
आतां या पदातें देउनी लात ॥ ह्मणे मी जाईन अविनाशपदा

माहिती— कर्त्याचे नावें कळत नाहीं.

२३४५ आरण्यपर्व प्रसंग १७ मुक्तेश्वर कृत

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. १६

बर्नेल. नं. — पानें ४

अनु. क्र. अं. १२० ग्रंथसंख्या ८०

आरंभ — चक्रवर्ती सिरोमणी ॥ जन्मोजयाचा तुये खाणी
ह्मणे वक्तया तुझी वाणी ॥ कामधेनु आमुतें ॥

सेवट — इति श्री आरण्यपर्व भारत ॥ मोक्षदाते कर्णामृत ॥
मुक्तेश्वर कवी विनवीत ॥ कृपा कीजे सज्जनी ॥ ६० ॥

माहिती— ओवी बद्ध. पानें किडे खाल्ले आहेत.

२३४६ नलोपाख्यान माधव कृत

अरा· नं· श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बर्नेल. नं. — पानें १८४

अनु. क्र. अं. २१४ ग्रंथसंख्या १३७४

वर्ग. क्र. अं. १७

आरंभ — स्वयंवर अध्याय ७.

सेवट — नळ राज्य प्राप्ती. अध्याय-१०.

माहिती— अध्याय १०स बयाज:- अध्याय-१. स्वयंवर गमनं. अ. २. दमयंती स्वयंवर. अ. ३. नळद्यूत पराभव. अ.४. नळ दमयंती वियोग. अ. ५. दमयंती विलाप. अ. ६. दमयंती राजमातृ समागमन. अ. ७. दमयंती मातृ पितृ दर्शनं. अ. ८. ऋतुपर्ण नळागमनं. अ. ९. नळ परिक्षा अ. १०. नळ राज्य प्राप्ती.

काल :- अध्याय-१०. पानें-२०. शक सत्तराशे चौऱ्याहत्तर ॥ परिधावी नाम संवत्सर ॥ चत्र वद्य नवमी इंदुवार ॥ तें नलोपाख्यान सुंदर संपविलें ॥

२३४७ बभ्रुवाहन आख्यान श्रीधर कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें १३

अनु. क्र. अं. २५४ ग्रंथ छापी

वर्ग. क्र. अं. १८

आरंभ — जयमिनी ह्मणे राजेंद्रा ॥ जन्मेजयाचा तुर्यसमुद्रा ॥
शामकर्ण आला मणिपूर नगरा ॥ तवं अपूर्व वर्तले ॥ १ ॥

सेवट — सुरस पांडवप्रताप ग्रंथ ॥ अश्वमेध जयमिनी कृत ॥
त्यांतील सारांश यथार्थ ॥ साठ्यांत कथियेला ॥ १९२ ॥

माहिती— जयमिनी प्रोक्त पाण्डव प्रताप ग्रंथांतील आख्यान ॥

कर्ता :- पांडुरंगपुरविलाशीया ॥ ब्रह्मानंदा यतीवर्या ॥
श्रीधर वरदा पंढरी राया ॥ कथा सुरस बोलवी पुढें ॥

काल :- शके १७०९. नल नाम संवत्सर.
मुंबईत बापुहरशेट देवळेकर यानीं आपुले छापखान्यांत छापिले

२३४८ आर्यावृत्त भारत मयूरपण्डित कृत

अरा. नं. श्रीमहादेवराव घाटगे यांची देणगी. अरा-२.

बंडल. नं — पानें ५०९

अनु. क्र. अं. २९३ ग्रंथसंख्या २१३७८

वर्ग. क्र. अं. १९

आरंभ — आदिपर्व ॥ नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमं ॥
॥ देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

सेवट — स्वर्गारोहण पर्व ॥

॥ ज्यांच्या वचनीं चित्तीं कर्मी सर्वत्र भाव कुशळ वसे ॥
॥ या कृतीस तेची गातील सुकृती वाल्मीकी कृति सुकुशलवसे ॥

माहिती— प्रत्येक पर्वाच्या मुखपत्रावरहीं वेलदारी चित्र सुन्दर आहेत.
ग्रंथ अति सुन्दर असूनहीं अपूर्ण आहे. विशोक पर्व अढळत
नाहीं. मूळग्रंथाचे मालक हीरुस्वामी घाटगे.

काल :- शके १७४८. व्यय संवत्सरीं अनेक लेखकां कडून लेखन झोलें असे.

२३४९ भारत - सभा पर्व श्री माधवस्वामी

अरा. नं. श्री महादेवराव घाटगे यांची देणगी. अरा-३.

बंनेल. नं. — पानें १८०

अनु. क्र. अं. २९४ ग्रंथसंख्या ३९६०

वर्ग. क्र. अं. २०

आरंभ — ॐ नमोजी गौरीनंदना ॥ सुरासुरादि विश्ववंदना ॥
भक्त अपाय विघ्न कंदना ॥ अंगीं चंदना मिरविसी ॥ १ ॥

सेवट — तेणें नृपवर निवांत ठेला ॥ वैशंपायन सांगे भारताला ॥
सूत निरोपी शौनकादिकांला ॥ महाभला पंडित ॥ ५९ ॥

माहिती— काळ :- पानें - १८०. वोवी ६०-६२. इतुकेनें सभा पर्व समाप्ती ॥ आरंभ पुष्य शुद्ध येकादशी तिथी ॥ माधवद्यषष्टीसु निश्चिती ॥ वासर ह्मणती भौम ज्यासी ॥ तये दिनीं द्वययाम प्रहरी ॥ समाप्त झाले पर्व भारी ॥ कोठें अधिक उणी परी ॥ असल्यां चतुरीं क्षमा कीजे ॥ शकें सोळा शतें पंचवीस ॥ सुभानु संवत्सर माघ मास ॥ पर्व पावले समाप्तीस ॥ नासती दोष श्रवणेंची ॥

कर्ता व स्थळ :- पानें १८०. वोवी ६३ ते
प्रसिद्ध जेकां गौरी मयूर ॥ त्या समीपची त्रिवंदूर ॥
उभय ग्रामामधे नीर ॥ प्रवाहे सुंदर कावेरीचे ॥ ६३ ॥
तिचीये वामभागीं सुंदर ॥ लघु देवालय मनोहर ॥
माजी लक्ष्मण सीतेसीं रघुवीर ॥ वस्ती निरंतर करीतसे ॥६४

त्याचीये दयेनें भारत ॥ करावया धरीले आरत ॥
तेणें पुरविले न बोलत ॥ साक्षी भगवंत अंतरीचा ॥ ३५ ॥

रामदास राम उपासक ॥ त्याचे आह्मी परंपरा लोक ॥
गुरु राघवदास धार्मिक ॥ ज्याची अत्यंतिक प्रीती रामीं ॥ ६६

त्याचीया अभयहस्त जळें ॥ ह्रदय तटाकांतुनी वळें ॥
निपजली हे प्रबंध कमळें ॥ माधव सकळ ह्मणतसे ॥ ६७ ॥

२३५० पांडवप्रताप - आदि पर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्रीभीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं. — पानें २४८

अनु. क्र. अं. ३७१ ग्रंथसंख्या ३८५५

वर्ग. क्र. अं. २१

आरंभ — श्री ईशस्तवन व कुल देवता स्तवन करुन
ॐ नमोजी दिगंबरा ॥ ब्रह्मानंदा निर्विकारा ॥
पुराण पुरुषा परात्परा ॥ जगदोद्धारा जगत्पती ॥ १ ॥

सेवट — अ. १४. ॥ पुंडलीक वरदा श्री पांडुरंगा ॥ रुक्मिणी ह्रदयारविंद भृंगा ॥ श्रीधरवरदा अभंगा ॥ ब्रह्मानंदा अक्षयी तूं ॥ ७८ ॥

माहिती— चौदा अध्यायाचा ग्रंथ. कुल ओव्या ३०८४.

कर्ता:- अ. १४. पानें १५. ओवी ७७ ब्रह्मानंदस्वामी पिता ॥ सावित्री नामें माझी माता ॥ वंदोनी श्रीधर उभयतां ॥ आदि पर्व संपविलें ॥

स्थल:- अ. ७. पानें-१७. ओवी-१३. पांडुरंग नगर पुण्यरूप ॥ श्रीविठल मूर्ती समीप ॥ निपजला पांडव प्रताप ॥ ग्रंथ परम गोड हा ॥

गुरु :- अ. १०. पानें-१६ वोवी-१९२. तो भीमा तीरीं
श्री दिगंबर ।। श्रीधर हृदयारविंद भ्रमर ।। यतिवर्य ब्रह्मानंद
उदार ।। अभंग साचार न विटे ।।

२३५१ पांडव प्रताप सभापर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी अरां. १-

वर्नेल. नं. — पानें ११६

अनु. क्र. अं. ३७२ ग्रंथसंख्या २१५०

वर्ग. क्र. अं. २२

आरंभ — श्री गणेश शारदा सद्गुरुभ्यो नमः ।।
जय जय जगद्गुरु ब्रह्मानंदा ।। पांडुरंग पुंडलीक वरदा ।।
विद्वज्जन हृत्पद्ममिळिंदा ।। आनंदकंदा जगत्पती ।। १ ।।

सेवट — अ. ८ ।। श्रीमद्भीमातट विलासा ।। दिगंबरा श्री पंढरीशा ।।
श्रीधरवरदा अविनाशा ।। ब्रह्मानंदा दयाब्धी ।। ५९ ।।

माहिती— आठ अध्यायांचा ग्रंथ. कुल वोवी - १७२२.
कर्ता :- अ. १. पानें-२. वोवी १६ ।। ×××
त्यांतील सारांश साचार ।। वटबीजवत अणुमात्र ।।
ब्रह्मानंदें श्रीधर ।। कथा साचार वर्णित ।।

स्थल :- अ. ३. पानें-२०. वोवी-३३

।। पंढरी नगरींच यथार्थ ।। प्रगटला पांडवप्रताप ग्रंथ ।।
।। श्रवणें सकलें संकट निवारत ।। सत्य सत्य श्रोते हो ।।

लेखक :- अं ८. पानें-११. सेवट -
।। पांडव प्रताप ग्रंथ महाथोर ।। त्यामाजी सभापर्व कपटसार ।।
।। सखाराम मोहिते शिलेदार ।। लिही सादर हीरोजीहीं ।।

२३५२ पांडवप्रताप - वनपर्व श्रीधर स्वामीकृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं. – पानें १६६

अनु. क्र. अं. ३७३ ग्रंथसंख्या ३०००

वर्ग. क्र. अं. २३

आरंभ — पकजोद्भव पाकशासन ॥ सदा वंदिती ज्याचे चरण ॥
ज्यान्हीया अष्टादशगुण ॥ त्याचे वर्णिती सदा ॥ १ ॥

सेवट — अ. ९. पानें-१८. वोवी-२५१.

॥ ब्रह्मानंदा श्री रुक्मिणीवरा ॥ श्रीधरहृदयकलहारभ्रमरा ॥
॥ तव वरदें जगदोद्धारा ॥ ग्रंथपुढें चालोकीं ॥

माहिती— नऊ (९) अध्यायांचा ग्रंथ. अति शिथिल आहे.

२३५३ पांडवप्रताप - विराटपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी अरा-१.

बर्नेल. नं. – पानें ५८

अनु. क्र. अं. ३७४ ग्रंथसंख्या ११२५

वर्ग. क्र. अं. २४

आरंभ — जगद्गुरु आदि पुरुष ॥ आदिमायेंचा भर्ता ईश ॥
ब्रह्मा विष्णु महेश ॥ बाळकें पोटी निर्मिली ॥ १ ॥

सेवट — अ. ४. पानें-१६. वोवी-२३३.

॥ पांडव प्रताप ग्रंथ अपूर्व ॥ त्यामाजी च्यारी अध्याय विराट पर्व
॥ पुढें अपूर्व उद्योगपर्व ॥ ब्रह्मानंदें परिसिजे ॥

माहिती— च्यारी अध्यायांचा ग्रंथ. कुल वोवी - ८९४. ग्रंथ-११२५.
कर्ता:-अ. ४. पानें-१५. वोवी २३२. तूं जरी राखिसी पाठी ॥ तरी ग्रंथ पावेल सेवटी ॥ श्रीधरवरदा जगजेठी ॥ कृपा दृष्टी पाहे कां ॥

२३५४ पांडवप्रताप - उद्योगपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं. — पानें ७७

अनु. क्र. अं. ३७५ ग्रंथसंख्या १३८६

वर्ग. क्र. अं. २५

आरंभ — ईशस्तवन जाहल्यावर ॥
अनेन प्रियतां देवो भगवान् रुक्मिणी पतिही ॥
॥ श्री वासुदेव पूर्वेशा ममस्माकं कुल देवतं ॥

सेवट — अ. ५. पानें १६. वोवी २३४
॥ तरी ब्रह्मानंदा श्री पंढरीनाथा ॥ पुढें वोलवी रसाळ कथा ॥
॥ लोक ह्मणती तुज सर्वथा ॥ श्रीवरदा श्रीपांडुरंगा ॥

माहिती— ग्रंथमहिमा :- अ. ४. पानें १६. ॥ या ग्रंथाचा कर्ता निश्चित स्वयें आहे श्री पंढरीनाथ ॥ तो जे जे सुरस शब्द संगत ॥ तेंचि लिखित केलें येथें ॥ २३२ ॥ तो सांगेल तेंचि करावें ॥ बोलतां तेंचि पत्रीं लिहावें ॥ तो न सांगेल तरी उगाचि राहवें लेखणी घेवोनीयां ॥ २३३ ॥ पांच अध्यायांचा ग्रंथ. कुल वोवी-११०९.

२३५५ पांडवप्रताप - भीष्म पर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-. १

बर्नेल. नं. —        पानें ४४

अनु. क्र. अं. ३७६        ग्रंथसंख्या ८००

वर्ग. क्र. अं. २६

आरंभ — ईशस्तवन जाहल्यानंर ।। जय जय भद्रकारके भवानी ।। मूळ पीठ द्वारका वासिनी ।। आदि मायेची तूं कुळस्वामिनी ।। प्रणव रूपिणी श्रीरंगे ।। १ ।।

सेवट — श्रवणें होय रोग हरण ।। स्त्रीयांस सौभाग्य पूर्ण ।। ऐसें बोलीला वैशंपायन ।। सत्कारुनी सर्वांहीं ।। २३८ ।।

माहिती— कर्ता :- अ. १. पानें २. वोवी ८. ।। अंबे तुझे दिवटे अपार ।। त्यामाजी दासानुदास श्रीधर ।। तेणें पांडव प्रताप दीपिका थोर ।। पाजळिली यथा मती ।। तीनी अध्यायांचा ग्रंथ. कुळ वोव्या-६४८

२३५६ पांडवप्रताप - द्रोण पर्व        श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं. —        पानें ४८

अनु. क्र. अं ३७७        ग्रंथसंख्या १२००

वर्ग. क्र. अं. २७

आरंभ — ईशस्तवनानंतर :—

।। पुंडलीक वरदा पुरुषोत्तमा ।। भक्त मानसा उद्यान विहंगमा ।।
।। भीमातट विहारा मेघश्यामा ।। निगमागमा वेद्य तूं ।।

सेवट — द्रोण पर्व करीतां श्रवण ।। एक शत यज्ञाचे श्रेय पूर्ण ।। ऐकतां विजय कल्याण ।। होय क्षाळण महादोषा ।। २६४ ।। अ. ३. पानें १७.

माहिती— तीनी अध्यायांचा ग्रंथ. कुल वोवी ११००.

२३५७ पांडवप्रताप - कर्णपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

वर्नेल. नं. — पानें ४३

अनु. क्र. अं ३७८ ग्रंथसंख्या ८५०

वर्ग. क्र. अं. २८

आरंभ — ईशस्तवनानंतर,

॥ जन्मेजयासी ह्मणे वैशंपायन ॥ परंधामा पावला गुरु द्रोण ॥
॥ येथुनी कणपर्व संपूर्ण ॥ येक चित्तें ऐक पां ॥

सेवट — अ. ३. पानें १५· वोवी २०७. ॥ येथुनी शल्य पर्व अवधारा पंढित श्रोते श्रवण करा ॥ श्रीधरवरदा जगदोद्धारा ॥ मनोरथीं बैसा तुह्मी ॥

माहिती— तीनी अध्यायांचा ग्रंथ. कुल वोव्या ६२१.

२३५८ पांडवप्रताप - शल्यपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

वर्नेल. नं. — पानें १०

अनु. क्र. अं. ३७९ ग्रंथसंख्या १७०

वर्ग. क्र. अं. २९

आरंभ — ईशस्तवनानंतर,

॥ पंढरीस दक्षणद्वारका ॥ तुज आवडे रुक्मिणीनायका ॥
, ॥ सांडूनीयां वैकुंठ सुखा ॥ पुंडलीका लागी आलासी ॥

सेवट — पानें ९. वोवी ३२.

॥ शौनकादिक महामुनी ॥ श्रवण करीती नैमिशारण्यीं ॥

॥ वेदव्यासप्रसादेंकरूनी ॥ सूत सांगे तयांतें ॥

माहिती— कुल वोवी १३६.

२३५९ पांडवप्रताप - गदापर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बंडल. नं. — पानें. १२

अनु. क्र. अं. ३८० ग्रंथसंख्या २०३

वर्ग. क्र. अं. ३०

आरंभ — ईशस्तवनानंतर

॥ पांडवपाळका पुराणपुरुषा ॥ पद्मजजनका पयोनिधीवासा ॥

॥ विश्वपाळका जगन्निवासा ॥ पंकजनेत्रा परात्परा ॥

सेवट — ॥ सौप्तिक पर्व पावन ॥ श्रीधर मुखें करून ॥

॥ बोलेल कैसे रुक्मिणी रमण ॥ ब्रह्मानंदें परिसोव ॥ १२६

२३६० पांडवप्रताप - सौप्तिकपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बंडल. नं. — फार्मे ९

अनु. क्र. अं. ३८१ . ग्रंथसंख्या १४६

वर्ग. क्र. अं. ३१

आरंभ — ईश्वरस्तवनानंतर ॥

॥ मागें गदापर्व संपलें दख ॥ पुढें आरंभिल सौप्तिक ॥
॥ वैशंपायन वक्ता सुरेख ॥ जन्मेजयाप्रती सांगे ॥ १ ॥

सेवट — ॥ सौप्तिक पर्व समाप्त ॥ एकाच अध्यायांत झाले येथें ॥
॥ पुढें ऐषिक पर्व पण्डित ॥ श्रवण करोत आदरें ॥ ११७ ॥

२३६१ पांडवप्रताप - ऐषिकपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. न. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं. — पानें ९

अनु. क. अं. ३८३ ग्रंथ संख्या १८०

वर्ग. क्र. अं. ३२

आरंभ — ईशस्तवनानंतर ॥

॥ जय जय क्षीराब्धीजावरा ॥ मत्स्यरूपा वेदोद्धारा ॥
॥ महाकपटीया शंखासुरा ॥ वधुनी धर्म वाढविले ॥ १ ॥

सेवट — पानें-९ - वोवी ११९.

॥ आदिपर्वापासुनी जाणावें ॥ ऐषिक पर्व बारावे ॥
॥ पंढरीनाथें दयार्णवें ॥ अंतीं अपूर्व कथियेलें ॥

माहिती— कर्ता :- पानें-९. वोवी-१२०.

॥ श्रीधरवरदादितकरा ॥ ब्रह्मानंदा परम उदारा ॥
॥ भीमातीर विहारा दिगंबरा ॥ अभंग भजन देई तुझें ॥

२३६२ पांडवप्रताप - स्त्रीपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं. — पानें १०

अनु. क्र. अं. ३८४ ग्रंथसंख्या २००

वर्ग. क्र. अं. ३३

आरंभ — ईशस्तवनानंतर ॥

॥ वैशंपायन ह्मणे राया ऐक ॥ मागें संपले विशोक ॥
॥ पुढें स्त्रीपर्व सुरस देख ॥ आतां परिसा यावरी ॥ १ ॥

सेवट — पानें-९. वोवी-१२९ ॥

॥ स्वस्त्रस्थळा गेले पांडुनंदन ॥ स्त्रीपर्व संपले येथुन ॥
॥ पुढें शांतिपर्व परम गहन ॥ वैशंपायन बोलेल ॥ १२१ ॥

२३६३ पांडवप्रताप - शांतिपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची दणगी. अरा-१.

बर्नेल. नं — पानें २२

अनु. क्र. अं. ३८५ ग्रंथसंख्या ४५०

वर्ग. क्र. अं. ३४

आरंभ — अ. १. पानें-१.

॥ अद्भुत कथेची महिमा ॥ देउं गीदावरीची उपमा ॥
॥ स्नान करीतां कर्माकर्मा ॥ पासोनी मुक्त होईल ॥ १ ॥

सेवट — अ. २. पानें-८. ओवी-५.

॥ श्रीरंगासहीत पांडव ॥ हस्तिनापुरा आले सर्व ॥
॥ धर्मरीतीं धर्मराव ॥ राज्य करीता झाला ॥

माहिती— दोनी अध्यायाचा ग्रंथ. प्रथमाध्याय पानें-१४.
द्वितीय अध्याय पानें-८. कुल वोवी-३१३.

२३६४ आर्या भारत - आदि पर्व श्रीमयूरेश्वर

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बंडल. नं. — पानें १९३

अनु. क्र. अं. ४०० ग्रंथसंख्या ३१००

वर्ग. क्र. अं. ३५

आरंभ — ईशस्तवनानंतर :-

॥:श्रीमत्सद्गुरु नारद वाल्मीकी की व्यास शुक कवीश मनीं ॥
॥ आणुनी नमितों भावें जे मोह तमाचीयारवीशमनीं ॥

सेवट — ॥ शरणागतासी हेचि व्ययनीं देणार शर्म परम तीघे ॥
या तत्त्वा तें येथें मूर्ख न घे स्वहित धर्म परम तीघे ॥ १०२ ॥

माहिती— अध्याय संख्या ३४. ग्रंथ अति जुनें.

कर्ता :- श्रीराम नाम गुरु सुनिपुणवादकमयूर मुखवाद्य ॥
श्रीराम दयागाती गीत जय ग्रंथपर्व हे आद्य ॥
ऐकासज्जन हो भगवद्वचन खरें आश्चर्य स्यां पाहिलें ॥
वाल्मीकी प्रभृतीस्व वंदिनी करी दीनामला वाहिल ॥
प्राकृत काव्य ईश्वरपदीं धत्तूरसें वाहिलें ॥
सांगों काय वरप्रसाद आजि ते व्यासहिं कीं साहिलें ॥

२३६५ आर्या भारत - सभा पर्व श्रीमयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बंडल. नं. — पानें ५३

अनु. क्र. अं. ४०१ ग्रंथसंख्या ८५०

वर्ग. क्र. अं. ३६

आरंभ — ईश्वरस्तवनानंतर ।।

पांचाळी पतीस ह्मणे मज कांही सांग आपुली सेवा ।।
पार्थ ह्मणे सख्य असो अथवा हे माग यादव देवा ।। १ ।।

सेवट — विदुरोक्त हितहिं न तुज स्नेहैक परे न मानिलें काहीं ।।
केली म्याची न केली अक्षांहीं न हानिले काहीं ।। ९१ ।।

माहिती— अध्याय संख्या-७. अति शिथिल ग्रंथ ।।

कर्ता :- भक्त मयूरकरें हे श्री गुरूनें लिहविते सभा पर्व ।।
कीं आर्या नंदांचे रसिकांची नित्य हो सभा पर्व ।। ९२ ।।

।। इति श्रीमद्विद्वन्मकुट माणिक्य मणि भाषाप्रवंधरचना पराशरपारिण श्री रामानंद मयूरेश्वर विरचिते आर्याभारते सभापर्वणि सप्तमोध्याय: ।।

२३६६ अर्या भारत - उद्योग पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बनेंल. नं. – पानें १०९

अनु. क्र. अं. ४०२ ग्रंथसंख्या १८००

वर्ग. क्र. अं. ३७

आरंभ — सरसिजनाभ सभेंत द्रुपद विरादी निजजनांसहित ।।
बैसुनी मनीं विचारी द्याया साधुनी निज जनांस हित ।। १ ।।

सेवट — जन्मेजयासी ऐशी वैशंपायन कथी कथा ती तें ।।
गाय मयूर रसिक किंकर चित्तें असत्पथाती तें ।। १९ ।।

माहिती— अध्याय संख्या-१४. अति शिथिल.
कर्ता :- स्ववरविरचित गुरुवरें भारत लिहविलें मयूरकरें ।।
मुनि रचित मयूरेश्वर देवकरें द्वापरांत जें विहरें ।। २०

२३६७ आर्या भारत - भीष्म पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांचीं देणगी. अरा-३.

बंडल. नं. – पानें ७०

अनु. क्र. अं. ४०३ ग्रंथसंख्या ११२५

वर्ग. क्र. अं. ३८

आरंभ — हालाहल गळसा प्रभु उग्र तपापरी अनुग्रह व्यास ॥
ज्यास परहितीं वहु तो करी धृतराष्ट्रीं अनुग्रह व्यास ॥ १ ॥

सेवट — श्री नारद वाल्मीकी व्यास पराशर वसिष्ट शुक सुकवी ॥
प्रतिभा रक्षक नाशक खळ किंति अमृताश्रिता दवन सुकवी ॥

माहिती— अध्याय संख्या-११. शिथिल ग्रंथ.
कर्ता :- हे भीष्म पर्व पावो साधु श्रुती शुष्कुली न भासावे ॥
श्री व्यास कृत मयूरे विलिखित वेगळे न भासावे ॥

२३६८ आर्या भारत - कर्ण पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बंडल. नं. – पानें २०१

अनु. क्र. अं. ४०४ ग्रंथसंख्या ३२००

वर्ग. क्र. अं. ३९

आरंभं — भव्य प्रताप कण स्व पित्याहुनी फार संगरी तपला ॥
कीं ज्याच्या शर शशिमत्रातपदीं तो सहस्रकर लपला ॥ १ ॥

सेवट — जनमेजय श्रुतिप्रति वैशंपायन मुखेंचि हे गेली ॥
मग सूत मुखें शौनक मुख्य मुनि श्रोत्र मंदिरीं ठेली ॥ ७२ ॥

माहिती— अध्याय संख्या-५०, शिथिल ग्रंथ.
कर्ता :- श्रीमत्सदाशिवात्मज बाबूजी नायक प्रभुज्ञानी ॥
धन्य ह्मणावे ज्याला शुद्ध गुण श्रवण तृप्त सुज्ञानी ॥ ७३
दाता वक्ता योद्धा तेजस्वी मान धन असामान्य ॥
आतुले पितृप्रसादें मंडित देवव्रता असम मान्य ॥ ७४ ॥
या साधु संगमुदिरें मुदित श्रीराम सुत मयूर कृती ॥
नर नारायण विजय ग्रंथ करी व्हावया सुखी सुकृती ॥ ७५ ॥

२३६९ आर्या - भारत शल्य पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बर्नेल. नं — पानें ३२

अनु. क्र. अं. ४०५ ग्रंथसंख्या ५००

वर्ग. क्र. अं. ४०

आरंभ — गरुडध्वज चरणाश्रित चरित श्रवणें त्रिताप संव्हरिते ॥
भगवत्प्रेम वसाया करित हृदयासी पिटुनी अहरिते ॥ १ ॥

सेवट — श्रीमद्रामपदीं हे तुलसी दळ वाहिले सुरसमोरे ॥
जाले प्रेमें ज्याच्या ब्रह्मादि समस्तहीं सुर समोरे ॥ ८९ ॥

माहिती— अध्याय संख्या-४. शिथिल ग्रंथ.

२३७० आर्या भारत - गदा पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बर्नेल. नं. — पानें ३७

अनु. क्र. अं. ४०६ ग्रंथसंख्या ६००

वर्ग. क्र. अं. ४१

आरंभ — वारणपुरपाळ ह्मणे सांग पुढें संजया कसें जाल ॥
चत्रघां अवशिष्टांच्या हृदईं कर्तव्य कोणतें आलें ॥ १ ॥

सेवट — हर्षती पावोनी जसे साधु रसिक विप्रया गदा पर्वा
निवतील तसे पाहुनी साधु रसिक विप्रया गदा पर्वा ॥ ३९ ॥

माहिती— अध्याय संख्या-१०. शिथिल ग्रंथ.
कर्ता :- हे पर्वपुष्प वाहे श्रीराम पदीं मयूर तो भावें ॥
शोभावे साधु शिरीं यासी रसिक मधुपवृंद लोभावें ॥ ४० ॥

२३७१ आर्या भारत - सौप्तिक पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बर्नेल. नं. — पानें ९

अनु. क्र. अं. ४०७ ग्रंथसंख्या १४०

वर्ग. क्र. अं. ४२

आरंभ — ॥ वाडव वीर गुरु तनय कृप कृतवर्मा निघोनीयां गेले ॥
॥ शिबिरासमीप जाऊनी रात्री मुखि ते मुहूर्त भरी ठेले ॥ १

सेवट — ॥ आयुष्य दीर्घ असकृत्सोडुनी निश्वास काष्ठसा अंध ॥
॥ निश्चेष्ट होय शोकें न दृढस्नेहा असा दुजा बंध ॥ ५२ ॥

माहिती— अध्याय संख्या-२. शिथिल ग्रंथ.

२३७२ आर्या भारत - ऐषीक पर्व श्री मयूरेश्वर विरचित

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बर्नेल. नं. — पानें १४

अनु. क्र. अं ४०८ ग्रंथसंख्या २२५

वर्ग. क्र. अं. ४३

आरंभ — ।। वार्ता सांगे धृष्टद्युम्नाचा सारथी नरवराती
।। पडला पांडव कर्णी निद्रेंत तसाहीं तो नर वरार्त्तीं ।। १ ।।

सेवट — ।। जा शरण ईश्वराला त्याचाचि हित प्रसाद साधुनीघे ।।
।। डोहाकडेंचि जैसा अति तप्त शिवाकडेंचि साधु निघे ।। ४३

माहिती— अध्याय संख्या-३. शिथिल ग्रंथ.
कर्ता ।। पानें-१४.
।। निवडुनी भक्त मयूरा करुणाघन हाच नाच पिकवीतो ।।
।। बहु सुकृत यशस्सस्य क्षेत्रीं क्षेत्रीं यथेष्ट पिकवितो ।।

२३७३ आर्या भारत - स्त्री पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांचा देणगी. अरा-३.

बर्नेल. नं. — पानें २८

अनु. क्र. अं. ४०९ ग्रंथसंख्या ४५०

वर्ग. क्र. अं. ४४

आरंभ — ।। नगरीस शोक संजय येऊनी धृतराष्ट्र राज सदना तें ।।
।। कळवी सविस्तर वृकोदर कृत दुर्योधनोरू कदना तें ।। १ ।।

सेवट — ।। श्री गंगेंतूनी निघुनी तीरींच सशोक धम तो बसला ।।
।। भक्त मयूरघन श्रीरामजसा सिंधूच्या तटीं बसला ।। ६७ ।।

माहिती— अध्याय संख्या-६. ग्रंथ शिथिल आहे.

२३७४ आर्या भारत - अनुशासन पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बर्नेल. नं — पानें ४५

अनु. क्र. अं. ४१० ग्रंथसंख्या ७५०

वर्ग. क्र. अं ५०

आरंभ — विंदुवर नदी नंदन सांगे बहुदान धर्म धर्मा ते ॥
॥ व्हावे कृत कृत्य सुखें जीवाहीं ज्या करूनी कर्मा ते ॥ १ ॥

सेवट — ॥ श्रीमत्कृष्णोक्ति करीत्या गंगेच्याहीं दूर शोकास ॥
॥ जी पापताप वारुनी निववी तसे कीर्तनेंहीं लोकांस ॥ ९७-

माहिती— अध्याय संख्या-८. शिथिल गूंथ.
कर्ता :- ॥ रामसुत मयूर ह्मणे ज्ञात्या रसिकांसी पसरुनी पदर ॥
॥ मी तुमच्या अमृतकरें गरुडें पावेन जेंवि निपदर ॥ ९९ ॥
॥ सज्जन मा तें देवूं संग जसा गरुड दे कदंबातें ॥
॥ देणें मीच नगाइल बहुनाकीं मत्पिता मदंबातें ॥ १०० ॥

२३७५ आर्या भारत - अश्वमेध पर्व श्री मयूरेश्वर कृत

अरा. नं. श्रीमभीराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बनॅल. नं. — पानें ५१

अनु. क्र. अं. ४११ ग्रंथसंख्या ८००

वर्ग. क्र. अं. ४६

आरंभ — ॥ दायाद पांडुचा त्या गांगेया आठवूनियां रडला ॥
॥ दारुण कर्में मूर्छित होउनी गंगातटींच तो पडला ॥ १ ॥

सेवट — ॥ श्री राम पदीं अर्पित केलें हयमेध पर्व चवादावें ॥
॥ सामर्थ्य पारिजातीं जे तें कुसुमीं हीं सर्वच वदावें ॥ ४५ ॥

माहिती— अध्याय संख्या-६. शिथिल ग्रंथ.

२३७६ आर्या भारत - मौसल पर्व श्री मयूरेश्वर विरचित

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

वर्नैल. नं. — पानें १५

अनु. क्र. अं. ४१२ ग्रंथसंख्या २२५

वर्ग. क्र. अं. ४७

आरंभ — ।। जनमेजयप्रती ह्मणे वैशंपायन कथा परिस राया ।।
।। तुमजे वळासी किमपि लागेचि भव्य यापरिसराया ।। १ ।।

सेवट — ।। जय गजपुरासी जाउनी वृत्त अनुज गुरुजनां सकळ कळवी ।।
।। जागों सांगुनी मानस शोष सिताछिद मनास कळकळवी ९०

माहिती— अध्याय संख्या-२. अति शिथिल ग्रंथ.
कर्ता :- ।। रामसुत मयूर रचित हे केकारूप पर्व सोळावें ।।
।। येणें श्री कृष्णघनें शमवाया सर्व ताप बोळावें ।। ९१ ।।

२३७७ आर्या भारत - स्वर्गारोहण पर्व श्रीमयूरेश्वर

अरा. नं श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-२.

वर्नैल. नं. – पानें १०

अनु. क्र. अं. ४१३ ग्रंथसंख्या १५०

वर्ग. क्र. अं. ४८

आरंभ — ।। तिलक सुकृत कीर्तीचा धर्म स्वर्गासी शतमखें नेला ।।
।। केला बंधु वियोगें खिन्न परिसुरादराग्रहें गेला ।। १ ।।

सेवट — ।। श्रीमान्सर्व श्रेष्ट ग्रंथाच्या पूज्यहाजय शता तें ।।
।। ज्यांत सुकाच्या केलें प्रकट कथुनी धर्मराज यश ता तें ।।३०

माहिती— ।। अध्याय संख्या-२. ग्रंथ शिथिल.
गुरु :- ।। श्रीमदुपाध्यायोत्तम कविवर केशव गणेश पादरजा ।।
।। धरूनी शिरीं हे सयश लिहिलें पितानी साधु सादर ज्या ।। ३४ ।।

कर्ता :- ॥ जो धीर वीर हीर श्री शिद्धेश्वर महा दयापात्र ॥
॥ श्रीमान्बाबुराय प्रभु ज्याच शोभले यशें गात्र ॥ ३५ ॥
॥ भीष्म द्रोण समगुण शांडिल्य सुगोत्र पद्मरति देहा ॥
॥ आश्रय शंकर जैसा उपमन्यु मना मयूर कवि देहा ॥ ३६ ॥

× × ×

॥ ज्याच्यगानें व्हावे प्रेमाश्रु क्षपित चंदन मयूरें ॥
॥ आर्या समर्पिल्या हरि चरणीं श्रीराम नंदन मयूरें ॥ ५४ ॥

२३७८ पांडवप्रताप - आश्रमवासिकपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

वर्नेल. नं. — पानें १५

अनु. क्र. अं. ३८६ ग्रंथसंख्या २५५

वर्ग. क्र. अं. ४९

आरंभ — ईशस्तवनानंतर ॥ आदिपुरुषा दत्तात्रया ॥ श्रीमद्भीमातट विलासिया ॥ ब्रह्मानंदा यतिवर्या ॥ सद्गुरुराया सुखाब्धी ॥

सेवट — पाने-११. ओवी-४६ ॥ क्षण क्षणां कर्णी सांगत ॥ पाण्डव प्रताप सुरस ग्रंथ ॥ निजधाम न वर्णवे यथार्थ ॥ करी समाप्त येथोनीयां ॥ × × ×

माहिती— पानें-१. दशावतारस्तुती :- मत्स पुरुषा वेदोद्धारका ॥ कूर्म रूपा सृष्टिपाळका ॥ दंतावरी क्षमा धरिली देखा ॥ प्रल्हादवरदा श्रीहरी ॥ ४ ॥ दानव मर्दना बळिबंधन्या ॥ क्षत्रियांतका जामदग्न्या ॥ अयोध्यापती दशमुखमर्दना ॥ कंसांतका श्रीमुरारी ॥ कारुण्यवेषधारका ॥ कुतर्क यवन संव्हारका ॥ पुरुषोत्तमा श्री द्वारका नायका ॥ पंढरीशा परात्परा ॥ ६ ॥

गुरु परंपरा:- पानें-१४ ॥ श्रीधर ह्मणे माझा जनिता निश्चित ॥ ब्रह्मानंद अति विख्यात ॥ सावित्री माता गुणभरित ॥ पतिव्रता तपस्विनी ॥ ८५ ॥ पंढरीहूनी च्यारी योजनें दूरी ॥ नैऋत्य-कोनीं नासरनगरी ॥ तेथील देश लेखक निर्धारी ॥ पूर्वाश्रमी ब्रह्मानंद ॥ ८६ ॥

पंढरीस सन्यास घेवून ॥ समाधिस्थ तेथें पूर्ण ॥ वाळवंटीमध्यें वृंदावन ॥ विश्वजन पाहती ॥ ८७ ॥ क्षीर सागरीं नारायण ॥ त्याचा शिष्य चतुरानन ॥ तेथुनी अत्री झाला निर्माण ॥ श्री दत्तात्रेय त्यापासोनी ॥ ८८ ॥ त्रयदेवात्मक स्वरूप शुद्ध ॥ त्यापासुनी यती सदानंद ॥ तेथुनी रामानंद प्रसिद्ध ॥ समाधिस्थ वाराणसीये ॥ ८९ ॥ तेथुनी अमलानंद यती ॥ पुढें गभीरानंद महामती ॥ तेथोनी ब्रह्मानंद सुमती ॥ सहजानंद तेथोनीयां ॥ १९० ॥ कल्याणीस जयाची वस्ती ॥ तेथोनी पूर्णानंद महामती तेथुनी ॥ दत्तानंद सुमती ॥ नासर नगरीं समाधिस्थ ॥ ॥ १९१ ॥ तो महा पिता आमुचा सत्य ॥ तेथुनी ब्रह्मानंद यती अद्भुत ॥ पिता गुरु तोची यथार्थ ॥ जोकां विख्यात महाराज ॥ १९२ ॥

काल :- पानें-१४. ॥

विजय नाम संवत्सरीं ॥ ग्रंथ झाला श्री पंढरीं ॥
शके सोळाशे चवती सावरी ॥ ग्रंथ आकारा पैं झाला ॥ १९३

× × ×

माघमासीं विजय संवत्सरीं ॥ शुद्ध दशमी बुधवारी ॥
श्री पाण्डुरंग नगरीं ॥ ग्रंथ ते दिवसीं संपला ॥ १९६ ॥

२३७९ पांडवप्रताप - विशोकपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं. —  पानें ९

अनु. क्र. अं ३८७  ग्रंथसंख्या १६०

वर्ग. क्र. अं. ५०

आरंभ — ईशस्तवनानंतर ॥ वैशंपायन ह्मणे जन्मेजया ॥ कथा आईक पुढें नृपवर्या ॥ दुर्योधन निमालियां ॥ धृतराष्ट्र सौवळी दुःखित ॥ १ ॥

सेवट — ब्रह्मानंदा आत्म्यारामा ॥ पाण्डुरंगा आदि अनामा ॥ श्रीधर वरदा पूर्णकामा ॥ मंगळधामा अभंगा ॥ ११६ ॥

२३८० पांडवप्रताप - अश्वमेधपर्व श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-१.

बर्नेल. नं –  पानें ८१

अनु. क्र. अं. ३८८  ग्रंथसंख्या २७५०

वर्ग. क्र. अं. ५१

आरंभ — ईशस्तवनानंतर ॥ जयजयाजी ब्रह्मानंदा यतेन्द्रा ॥ श्री पंढरी नगर विहारा ॥ श्री विठ्ठला रुक्मिणीवरा ॥ निर्विकारा निर्द्वंदा ॥ १ ॥

सेवट — अ. ६. पानें-११ ॥ श्रीमद्भीमातटविहारा ॥ ब्रह्मानंदा आनंद समुद्रा ॥ श्रीधर वरदा जगदोद्धारा ॥ अज अविनाशा अभंगा ॥ १४९ ॥

माहिती— अध्याय सहांचा ग्रंथ. कुल वोवी-११४६.

२३८१ अनुशासनपर्व माधवस्वामी कृत

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-२.

बर्नेल. नं. —— पानें ४८६

अनु. क्र. अं ३९२ ग्रंथसंख्या १०८८३

वर्ग. क्र. अं. ५२

आरंभ —— गणेश सरस्वती गुरु स्वामी ।। श्रोतें सज्जन साधुभूमी ।।
ते ग्रंथारंभीं स्तववावें आम्ही ।। भाव हृत्पद्मीं धरूनीयां ।। १ ।।

सेवट —— अ. ७७. पानें-७. वोवी-३३. तीची आज्ञावंदुनी शिरसी ।।
कृष्णादिक परतले पुरासी ।। पर्व कथा पावले समाप्तीसी ।।
इच्छिल्या अर्थासी श्रवणें लाहिजे ।।

७७ अध्याय आहेत. अनुक्रमणिका पानें-२१. ग्रंथ-३७०.

माहिती—— प्रत्येक अध्यायीं मुखपत्रावर रंगीत वेल्दारी चित्र आहेत.
ग्रंथ सुंदर आहे.

गुरु :- रामदास राम उपासक ।। त्यांचे आम्ही परंपरा लोक ।।
गुरु राघवदास धार्मिक ।। ज्याची अत्यंतिक प्रीती रामीं ।।
अ-७७. पानें-७. वोवी-१३९.

स्थळ :- ।। प्रसिद्ध जेकां गौरी मायोर ।। त्या समीपचि त्रिवं-
दूर ।। उभय ग्रामामध्ये नीर ।। प्रवाहे सुंदर कावेरीचे ।। १३६
तीच्यिाग्रामभागीं सुंदर ।। लघुदेवालय मनोहर ।।
माजी लक्ष्मण सीतेसीं रघुवीर ।। वस्ती निरंतर करीतसे ।। १३७

काल:- ।। शकें सोळासत एकोणतीसीं ।। वैशाख शुद्ध द्वितीयेसी ।।
शुक्रवारी आरंभ पर्वासी ।। शुभ दिवसी पैं केला ।। १३४ ।।
भाद्रपद वद्यषष्टी तिथी ।। शनिवार साहवे मुहूर्ती ।।
दिवसां झाली पर्वाची समाप्ती ।। दोष जळती ऐकतां भावें ।। १

अनुक्रमणिका :- श्रीमंत सखाराम साहेबांचे आज्ञेनें शंकरानें
तय्यार केला (अनुक्रमणिका पानें-१.)

अनुक्रमणिकेंत मुखपत्रावर हस्तनापुरांतून पाण्डवाकडी श्रीकृष्ण भीष्माचे भेटीस आले. तेंव्हा भीष्म श्री कृष्णास स्तुत्य करून तेजोत्कर्षण केल्या अवसराची सुंदर रंगीत चित्र आहेत.



॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे

# अनुबन्ध

वर्ग–४.

भागवत

नंबर २३८२ — २३८९.

२३८२ श्री रुक्मिणी स्वयंवर श्री एकाजनार्दन

अरा. नं. श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

वर्नेल. नं. – पांन ५५

अनु. क्र. अं. १९९ ग्रंथसंख्या ११००

वर्ग. क्र. अं. १

अपूर्त.

माहिती— अध्याय ७ ते १६. फार जीण पोथी

२३८३ मुरळी श्री रामानंद मयूरेश्वर

अरा· नं· श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बर्नेल. नं. — पानें २

अनु. क्र. अं. २२० ग्रंथसंख्या १३

वर्ग. क्र. अं. २

आरंभ — श्री गणेश शारदा स्तवनानंतर ॥

श्री कृष्णा गोपी तें भुलविसी तुं वाजउनी मुरळीला ॥
उरली लाज न लेशहीं परी गाती श्रीशिवादि सुर लीला ॥ १

सेवट — ऐसी समर्पिली हे मुरळी नवरत्नमालिका देवा ॥
दुसरी मयूर कवीनें कोण करावी स्वसार्थका शेवा ॥ १० ॥

माहिती— आर्याबद्ध मुरळी. आर्या संख्या ९. आद्य पानें कोरी ॥

२३८४ श्रीमद्भागवत दशमस्कंद (तैलंगी भाषा)

अनाम

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ३

बर्नेल. नं. — पानें ७३

अनु. क्र. अं. २८७ ग्रंथसंख्या १४९४

माहिती— अपूर्ण. भाषा तलगी.

२३८५ श्री आर्या भागवत सप्तमस्कंद व दशमस्कंद

श्री रामानंद मयूरेश्वर

सं अरा. नं. श्री महादेवराव घाटगे यांची देणगी. अरा-३.

बंडल. नं. —　　　　पानें. ६०

अनु. क्र. अ. २९७　　　　ग्रंथसंख्या १९८०

वर्ग. क्र. अं. ४

आरंभ — ॥ नरहरीचरित शुक वदे नारद सांगे युधिष्ठिरालाजें ॥
॥ ज्याचे रसिक कवी ह्मणती अमृता तूं यापुढें जडा लाजें ॥

सेवट — ॥ यश गाउनीयां ज्याची करीती कवी व्यास सुख सदा शेवा
॥ भागवत मंत्रमुक्तामणिमाला त्याची वाहिली देवा ॥

माहिती— ग्रंथ सुन्दर आहे. मुखपत्रावरी वेलदारी रंगीत चित्र आहेत.

मालक :- हीरुस्वामीराव घाडगे

लेखक :- सुब्बराव घाडगे

काल :- शक १७५५. विजय संवत्सर. माघशुद्ध त्रयोदशी स्थिरवार.

२३८६　रुक्मिणीस्वयंवर　　　　एकाजनार्दन

अरा. नं. श्रीमहादेवराव घाटगे यांची देणगी. अरा-८.

बंडल. नं. –　　　　पानें १८१

अनु. क्र. अं. ३३३　　　　ग्रंथसंख्या २१५०

वर्ग. क्र. अं. ५

आरंभ — अध्याय-१.

ॐ नमो जी कृष्णनाथा ॥ गणेश सरस्वती नामें धरिता ॥
तूंचि तूं कुळदेवता ॥ कवणा आतां मी प्रार्थूं ॥ १ ॥

सेवट — अध्याय-१८.

एका जनार्दना शरण ॥ ह्मणतां गेले येकपण ॥
सहज खुंटले निरूपण ॥ महा मौन कथेचें ॥ ८९ ॥

माहिती— अठरा अध्यायाचा ग्रंथ.

स्थळ :- अ. १८. प. १०. वोवी ८२. वाराणसी महापुरी ॥ मनकर्णिकेचे तीरीं ॥ श्रीरामजयंती माझारी ॥ ग्रंथ निर्धारीं संपला ॥

कर्ता :- अ. १८. प. १०. वोवी-८३. मुखीं जनार्दनचीवक्ता जनार्दनेंचि श्रोता ॥ जनार्दनेंचि ग्रंथ लिहिता ॥ सत्यसर्वथा हे वाणी ॥

काल :- शके चौदाशे त्रियाण्णव ॥ प्रजोत्पती संवत्सराचे नांव ॥
चैत्र मासाचे वैभव ॥ महा पर्व रामनवमी ॥
ते दिवसी सार्थक अर्थी ॥ रुक्मिणी स्वयंवर समाप्ती ॥
एकाजनार्दन कृपास्थिती ॥ ग्रंथ निश्चिती सगळा ॥

२३८७ भागवत दशमस्कंद माधव नंदन

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी अरा-२.

वर्नेल. नं. — पानें ४२८

अनु. क्र. अं. ३९१ ग्रंथसंख्या १०४२५

वर्ग. क्र. अं. ६

आरंभ — अध्याय-१. पानें-१.

ॐ नमोजी भालचंद्रा ॥ कविजन चित्तचकोरचंद्रा ॥
अनंत कल्याणगुण समुद्रा ॥ विज्ञानमुद्रा विनायका ॥

सेवट — अध्याय-९१. वोवी-२०२ ।।

।। कीं हे नव रसायन ।। जीव पुष्टीक रसायन ।।

।। श्रवणें ज्याचें केल्यां सेवन ।। जगज्जीवन चित्तीं प्रकटे ।।

माहिती— अध्याय संख्या ९१. ग्रंथ सुन्दर स्थितीत आहे.

पानें-२. ।। कवैल्यफळदानी कल्पतरु ।। जो उपशांतीचा केवळ मेरु ।।

।। श्री माधव नामा जनकगुरु ।। प्रणाम करूं यासी भावें ।। २६

।। उद्धरावया प्राकृत जन ।। कलयुगामाजी पावन ।।

।। वाल्मीकी आणि द्वैपायन ।। ज्यारूपें कृपायन अवतरलें ।। ३०

।। महाभारत श्री रामायण ।। योग वासिष्ट विष्णु पुराण ।।

।। मल्हारी महात्स्य गणेश पुराण ।। महात्स्य जाण विनायकाचे ।। ३१

।। दिव्य प्रबंध इत्यादिक ।। जेणें रचिले रसाधिक ।।

।। तैसेचि निर्मिले असंख्यश्लोक ।। पुण्यश्लोक स्तविती जया

कुलदैवत :- पानें-२. :- × × ×

।। उपास दैवत श्रीराम ।। अद्वैता ऐसें उपनाम ।।

।। ज्याचीया योगें निश्रम ।। यथार्थ परम ते जाले ।। ३३ ।।

काळ व स्थळ :- अध्याय ९१. पानें-२६३.

शके सोळाशें आठावन्न ।। पिंगळ संवत्सर पावन ।।

तैं दशमस्कंधारंभण ।। कल आपण इंदुपुरीं ।। २०३ ।।

कित्तेक दिवसानंतर ।। संपला ग्रंथ सुंदर ।।

विनवी माधव कुमार ।। जोडोनी कर श्रोतयांसी ।। २०४ ।।

२३८८ मंत्र भागवत श्री मयूरेश्वर विरचित

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बंडल. नं — पानें १४८

अनु. क्र. अं. ३९८ ग्रंथसंख्या २३५०

वर्ग. क्र. अं. ७

आरंभ — ईशस्तवनानंतर :-

॥ नळिनाक्ष प्रभु लक्ष्मी नयन मनोहर पदांबुज ध्यान ॥
॥ नवघननील चतुर्भुज जनमिला जो पुण्यकीर्तीचें स्थान ॥

सेवट — श्रीमंत भागवत भक्त वशाहरिते ॥ हे अर्पिले सुचिमणीयशाहरि ते
मालवय प्रभुवरा रुचले कराने ॥ कंठीं पिताधरी दिले निज लेखणे

माहिती— स्कंध १ ते ७ १-७. ११ व १२ स्कंध अढळतात.
इतर स्कंधांची माहिती मिळत नाहीं. अपूर्ते.

२३८९ भागवत - दशमस्कंध अध्याय-९.

येकाजनार्दन.

अरा. नं श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-७.

बंडल. नं. — पानें ७

अनु. क्र. अं. ४२६ ग्रंथसंख्या १००

वर्ग. क्र. अं. ८

आरंभ — येउनी जरासंधाप्रती ॥ वीर प्रतिज्ञा बोलती ॥
धनुष्य वाहुनीयां हातीं ॥ रणीं ख्याती लाऊं आह्मी ॥ १ ॥

सेवट — ऐका ते द्वंद्व आणि तुंबळ ॥ रणीं माजेल रण कल्होळ ॥
येका जनार्दनीं रसाळ ॥ कथा कलिमल नाशनि ॥ ६५ ॥

माहिती— फक्त हा एकच अध्याय रुक्मिणी स्वयंवरांतील आहे.



॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे अनुबन्ध

## वर्ग–५.

## पुराण

नंबर २३९० — २४३९.

२३९० श्री शिवलीलामृत श्रीधरस्वामी कृत

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. १

बं॓ंडल. नं. – पानें २३५

अनु. क्र. अं. १०० ग्रंथसंख्या ३२१०

आरंभ — दर्शार्ह नाम कळावती आख्यान

सेवट — श्रियाळाख्यान

माहिती— आख्यान १४ स बयाज. १. दर्शार्ह नाम कळावती. २. शिवरात्री महात्म्य भिल्लाख्यान. ३. गौतुमाख्यान. ४. द्युमत्सेन गोरक्षाख्यान. ५. वंश धर्म गुप्तपाख्यान. ६. चित्रांगदाख्यान. ७. शिवयोगी भद्रायु आख्यान. ८. भद्रायु आख्यान ९. शंबर शंबरी आख्यान. १०. नैध्रुव शारदाख्यान. ११. भद्रसेन

महानंदाख्यान. १२. भस्मासुराख्यान. १३. पार्वतीकल्याण आणि. १४. श्रियाळाख्यान.

गुरु :- अ. १४. पानें २१. ॥ श्रीधरस्वामी ब्रह्मानंद ॥ आनंद संप्रदाय आगाध ॥ क्षीरसागरीं गोविन्द ॥ आधीं उपदेशी कमलोद्भवा ॥ ६ ॥ तेथुनी अत्रिऋषि प्रसिद्ध ॥ तेथुनी दत्तात्रय आगाध ॥ त्यापासाव सदानंद ॥ रामानंद यती तेथुनी ॥ ७ ॥ तेथुनी अमळानंद गंभीर ॥ मग ब्रह्मानंद उदार ॥ त्यावरी कल्याणीं राहणार ॥ सहजानंद यती पैं ॥ ८ ॥ तेथुनी पूर्णानंद शुद्ध ॥ तयापासाव पिता महदानंद ॥ पिता तोचि श्रीगुरु प्रसिद्ध ॥ ब्रह्मानंद यतींद्र तो ॥ पंढरीहूनी च्यारी योजन दूरी ॥ नैऋत्य कोनीं नाझर नगरीं ॥ तेथील देश लेखन निर्धारीं ॥ पूर्वाश्रमीं ब्रह्मानंद ॥ २१० ॥ पुढें पंढरीस येऊन ॥ केलें तेथें सन्यास ग्रहण ॥ तेथेंचि समाधिस्त होऊन ॥ अक्षय वस्ती केलीहो ॥ २११ ॥ तो ब्रह्मानंद महाराज पिता ॥ सावित्री नामें माझी माता ॥ वंदोनी ते उभयतां ॥ शिवलीलामृतसंपविलें ॥ २१२ ॥

काळ :- शके सोळाशे च्याळीस ॥ विलंबी नाम संवत्सरास ॥ शुद्ध पौर्णिमा फाल्गुण मास ॥ रविवारी ग्रंथ संपला ॥

स्थळ :- ब्रह्म कुमंडलाच्या तीरी ॥ द्वादशमत नाम नगरी ॥ आदींत ग्रंथ निर्धारीं ॥ तेथेंचि जाला जाणिजे ॥
ग्रंथ फार जीर्ण आहे.

२३९१ हरि विजय श्रीधरस्वामी कृत

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. २

बर्नेल. नं. — पानें ४२६

अनु. क्र. अं. १०४ ग्रंथसंख्या ४२५०

आरंभ — ×××× चि येक दीप्ती ॥ पाहतां × हति शशी सूर्य ॥ १६

सेवट — सक श्रोतयांसी आदरें ॥ साष्टांग नमनें केलें श्रीधर ॥ ब्रह्मानंदें करुनी निर्धारें ॥ हरिविजय विलोकिजे ॥ २५२ ॥ इति श्रीहरि विजय ग्रंथ ॥ संमत हरिवंश भागवत ॥ चतुर भक्त परिसोत ॥ षट्‌त्रिंशती अध्याय गोडहा ॥

माहिती— पहिल्या अध्यायांत पहिली पान व मुखपत्र नाहीं. तृतीय अध्यायांत १२, १३, १४ हे तीनी पानेंहीं दिसत नाहींत. ग्रंथ किडे खाल्ले जावून अति जीर्ण आहे.

गुरु :- अ. ३६ पानें १५, पंढरीहूनी च्यारी योजन दूर ॥ पश्चमेसी नाझर नाम नगर ॥ तेथें वासकरी साचार ॥ ब्रह्मानंद पूर्वाश्रमीं ॥ ४९ ॥ पुढें पंढरीसी जावोन ॥ मग केले सन्यास ग्रहण ॥ त्यावारी भीमा तीरी संपूर्ण ॥ समाधिस्त नि ×× ॥ तो ब्रह्मानंद महाराज पिता ॥ सावित्रीं नामें माता ॥ श्रीधर पूजोनी उभयतां ॥ हरिविजय ग्रंथ संपविलें ॥

काळ :- श्री शालीवाहन शकें ॥ १७५७ ॥ मन्मथ नाम संवत्सर ॥ भाद्रपद वदे षष्टी ॥ शनीवारी ॥ श्रीहरिविजय ग्रंथ भरणी नक्षत्र ॥ घटिका २५ ॥ सकल ××× झाला ॥ लेखक ॥ सजीवराव अप्पासामी जादव ॥

२३९२ भक्ति विजय महिपतीस्वामी कृत

| | |
|---|---|
| सं. अग. नं. अमानत् | वर्ग. क्र. अं. ३ |
| बर्नेल. नं. — | पानें २३५ |
| अनु. क्र. अं. १०५ | ग्रंथसंख्या ९९१६ |

आरंभ — अध्याय १ ते ५६. ओव्या ७२३६.

सेवट — अढळत नाहीं. अपूर्त ग्रंथ.

माहिती— छापी. मुखपत्र नाहीं. ग्रंथ किडे खाल्ले जावून अति जीण दिसतें. कितियेक अध्यायांत पानें झडतात.

२३९३ भक्तिलीलामृत महिपती

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-७.

बनेंल. नं. – पानें १९५

अनु. क्र. अं. ४२२ ग्रंथसंख्या ४३५०

वर्ग. क्र. अं. ४

आरभ — अ. १. ॥ जय जय पांडुरंगा रुक्मिणीवरा ॥ अचळा निर्विकारा ॥ लीलाविग्रही करुणाकरा ॥ सर्वेश्वरा आदिमूर्ती ॥ १ ॥

सेवट — अ. १६ ॥ तुमचे आधारें साचार ॥ सप्रेम भरित माझे अंतर ॥ येऱ्हवी महिपती मूढ पामर ॥ नव्हे साचार कविकर्ता ॥ १५०

माहिती— सोळा अध्यायांचा ग्रंथ. पत्रें अति शिथिल आहेत.

२३९४ सुचरिताख्यान (इतिहास) वासुदेव कृत

सं. अ. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ५

बनेंल. नं. — पानें ४

अनु. क्र. अं. १२१ ग्रंथसंख्या १२०

आरंभ — श्रीमत्पंचनदीश ईश भगवान् लोकत्रयाचा पती ॥

सेवट — शिवदासोपाख्यानांतील : तो जप्येश कृपाब्धी सांब विलसे संह्याद्री कन्या तटी ॥

माहिती— श्रीपंचनद महात्म्यांतील आख्यान. सुचरित हा विप्रबाळानें पंचनदीशाचे स्तवन केल्यानें मृत्युपासून जगला.

हे आख्यानाचे कर्ते श्री वासुदेव कवी. यांचे कविता अनेक आहेत.

२३९५ कुलाल चरित्र (लिखित) शिवदास

स. अग. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ६

बंडल. नं. — पानें १३

अनु. क्र. अं. १२५ ग्रंथसंख्या २२९

आरंभ — आर्या ।।

।। गणपती सरस्वती गुरू पद्कमळ द्वंद्व वंदितों भावें ।।

।। यदनुग्रह प्रभावें भगवद्भजनांत चित्तलो धावें ।। १ ।।

सेवट — आर्या ।।

।। लेखन पठन करी जो कुलाल सुचरित्र भक्तियुक्त नर ।।

।। तो पूर्ण काम ऐसा होय जरा मृत्यु भीत मुक्तर ।। २१ ।।

माहिती— कर्ता
पानें १२ } साध्वी साधु सुखें मग अन्योन्य नांदती चिदाकाशीं
जे पुण्यक्षेत्र जगीं शिवदासा होय मुक्तिदाकाशी ।।

काळ : पानें-१ राक्षस नामक संवत्सर पुष्य वद्य पंचमी भानुवार स्थळ गौरी मायूर — गद्य पद्यात्मक निरूपण-गद्य पदांची जिनस व पदांची अनुक्रमणिका मुखपत्रावर दिलें आहे.

२३९६ लहु कुश आख्यान अनंत कवी

सं. अग. नं अमानत् वर्ग. क्र. अं. ७

बंडल. नं. — पानें ९१-२०४

अनु. क्र. अं १२६ ग्रंथसंख्या छापी

आरंभ — लहु कुश आख्यान.

सेवट — सोहिरोबा कृत स्फुट पदें

माहिती— या वहींत लहुकुश आख्यान मोरोपंत कृत विनायक महात्म्य धुंडिराज कृत प्रल्हाद चरित्र, कचेश्वरकृत गजेंद्र मोक्ष, भिक्षु कवी रामजोशी यांची काहीं लावण्या, आनंद तनय, सोहिरोबा यांची पदेंहीं आहेत. पुस्तक किडे खाल्ले जावून जीर्ण आहे ॥

२३९७ तुळसी आख्यान डी. वी. साधले कंपनी, मुंबई.

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बंडल. नं. — पानें ७

अनु. क्र. अं. १६१ ग्रंथसंख्या छापी

वर्ग. क्र. अं. ७

आरंभ — गणेश गौरीचा नंदन ॥ सिद्धि बुद्धिचा दाता पूर्ण ॥ आदि वंदावा गजवदन ॥ मगळमूर्ती मोरया ॥ १ ॥

सेवट — तुळसीची आरती.

२३९८ संतमालिका अनाम

अरा. नं. श्री गोपाळकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बंडल. नं. — पानें. १५

अनु. क्र. अं. १६२ ग्रंथसंख्या १२०

वर्ग. क्र. अं. ८

माहिती— ग्रंथ अपूर्ण आहे. अक्षरें मावळले आहेत. स्पष्ट दिसत नाहीत.

२३९९ श्री भक्ति विजय श्री महिपती

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बर्नेल. नं. – पानें ३३३

अनु. क्र. अं. १६९ ग्रंथसंख्या छापी.

वर्ग. क्र. अं. ९

माहिती— अध्याय १-५७.

शके १७८२. रौद्र नाम संवत्सरे कार्तिक मासे शुक्ल पक्षे पंचम्यां तिथौ मंदवासरे तद्दिने ग्रंथ समाप्तोयम् — अ. ५७. पानें-८. मुंबईंत बापुसदाशिव शेट हेगिष्टे रोल्ये श्रीवर्द्धनकर यानीं आपले छापखान्यांत श्री भक्तिविजयग्रंथ छापिला असे — अ. ५७. पानें ८. अध्याय १. पानें ४. हस्त लिखित. अ. ४५. पानें ६ च आहेत. अपूर्त.

२४०० श्री भक्तलीलामृत श्री महिपती

बर्नेल. नं. – पानें ३४१

अनु. क्र. अं. १७० ग्रंथसंख्या छापी.

वर्ग. क्र. अं. १०

माहिती— अध्याय १ ते ५१.

हा भक्तलीलामृत ग्रंथ मुंबईंत गणपत कृष्णाजी यांचे छापखान्याचे मालक आत्माराम कान्होबा यानीं शुद्ध करवून छापून प्रसिद्ध केला. शके १७९७ युवनाम संवत्सरे कार्तिक शुद्ध १५.

२४०१ भव भवानी संवाद

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बनेंल. नं. —  पानें ३

अनु. क्र. अं. १७६  ग्रंथसंख्या ४०

वर्ग. क्र. अं. ११

माहिती— अपूर्त

२४०२ श्री तुळसी महात्म्य  शेष

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बनेंल. नं –  पानें १३३

अनु. क्र. अं. २०२  ग्रंथसंख्या ९००

वर्ग. क्र. अं. १२

माहिती— अपूर्त. अध्याय २, ४, ७. व १२ यांत कित्येक पानें नाहींत. अध्याय १. पानें ११. बृहस्पती वदला पाप धौत ॥ ह्मणौनी शौनकां सांगे सूत ॥ खंडेकर कोनेर सुत ॥ शेष विनवित श्रोतयांसी ॥

काल :- अध्याय १५. पानें ८. शालीवाहन शकें अठराशे साहा तारुण नाम संवत्सरे चैत्रशुद्ध त्रीतीया स्थिरवारीं हा ग्रंथ संपूर्ण जाहला लिखितं.

२४०३ तुळसी महात्म्य  शेष

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बनेंल. नं. —  पानें ६

अनु. क्र. अं २०३  ग्रंथसंख्या ३५

वर्ग. क्र. अं. १३

आरंभ — पुन्हा सुत ह्मणे मुनी व्रजा ।। महद्योक्त तुळसी पूजा ।। विवाह कथितों समजा ।। जेणें भवश्रम जाय हरोनी ।।

सेवट — शिव कथिले ह्मणोनी प्रीती ।। शौनकादिकां कथी सौनी ।। कोनेर सुत शेष सुमती ।। करी विनंती श्रोतयां ।।

माहिती— अध्याय ११ मावें आहे.

२४०४ श्रीतुळसी महात्म्य शेष

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बर्नेल. नं. — पानें ९०

अनु. क्र. अं. २०४ ग्रंथ संख्या ६५०

वर्ग. क्र. अं. १४

माहिती— अपूर्ण. अध्याय १३ नाहीं. अध्याय २. ७ व १२ यांत काहीं पानें नाहींत.

२४०५ श्रीपांडुरंग महात्म्य श्रीधरस्वामी कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बर्नेल. नं. — पानें ८२

अनु. क्र. अं. २०५ ग्रंथसंख्या ९७०

वर्ग. क्र. अं. १५

आरंभ — अध्याय १ जय जय आदि पुरुषा दिगंबरा ।। जय जय भीमा विहारा ।। जय जय पांडुरंगा रुक्मिणीवरा ।। भुवन सुंदरा विठला

सेवट — अध्याय १० - ब्रह्मानंद श्रीधर ह्मणे ।। या ग्रंथीं भाव धरणें ।। नाहीं पार नाणें ।। सत्य सत्य त्रिवाचा ।। ६५ ।।

माहिती— ग्रंथ काल :- स्वस्ति श्रीं नृप शालीवाहन शके सत्राशे पंच्याहत्तर प्रमादीचे नाम संवत्सर ॥ उत्तरायणे वसंत रुतु चैत्र शुद्ध प्रति पदा स्तिर वार अश्विनी नक्षत्र सिंव्ह लग्न एतस्मिन् शुभ दिने उदयादी बात्रीस घटिकास तैं श्रीधरस्वामी कृत पांडुरंग महात्म्य पवित्र संपविले.

श्रीधरस्वामीकृत पांडुरंग महात्म्य गुणेबा रघुनाथराव जाधवांचे असे ॥ ग्रंथ सुंदर आहे.

२४०६ श्री तुळसी विवाह शेष

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें १८

अनु. क्र. अं. २०६ ग्रंथसंख्या १२४

वर्ग. क्र. अं. १६

आरंभ — अध्याय ३. नारदह्मणे पृथुप्रती ॥ जलंधर तो दैत्यपती ॥ सर्वाधिकारी होवोनी जगती ॥ असतां सुमती अवधारी ॥ १ ॥

सेवट — अध्याय ५. ह्मणोनी नैमिष वनीं ॥ शौनकादिकां सुतमुनी ॥ कथिता जाला ते पावनी ॥ ऐकिजे श्रवणी शेष ह्मणे ॥ ३४ ॥

माहिती— अध्याय ३, ४ व ५-पुरते आहेत. अपूर्त ग्रंथ.

२४०७ श्री तुळसी विवाह शेष

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बर्नेल. नं — पानें १३

अनु. क्र. अं. २०७ ग्रंथसंख्या ११५

वर्ग. क्र. अं १७

माहिती— वरील अंकाप्रमाणें. अपूर्त ग्रंथ.

२४०८ श्री पांडुरंग महात्म्य गोपाळ बोध

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ४२

अनु. क्र. अं. २०८ ग्रंथसंख्या १७०

वर्ग. क्र. अ. १८

आरंभ — अध्याय १.

ॐ नमो जी मंगळ रूपा ।। विघ्ननाशा ज्ञानदीपा ।।
विश्वव्यापका अभुपा ।। करी कृपा मजवरी ।। १ ।।

सेवट — अध्याय ५-

जो अनाथाचा कैवारी ।। उभा तिष्टत भीमा तीरी ।। त्यानें निर्मिली
हे पंढरी ।। कथा साजिरी पंढरी महात्म्या ।। ६१ ।।

माहिती— अध्याय ५- वोवी ६० ।।

गोपाळ बोध विनवी संतां ।। मी अज्ञान नव्हे कर्ता ।।
पुरातन आदि कथा ।। लिहितां सांगता पांडुरंग ।। ६० ।।

२४०९ श्री तुळसी आख्यान श्री नामदेव कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ९ (३ ते ११)

अनु. क्र. अं २१० ग्रंथसंख्या १२०

वर्ग. क्र. अं. १९

आरंभ — पानें १ व २ नाहींत.

सेवट — उद्धव ह्मणे घननीळा ॥ तुळसी पूजा सांगीतली सकळा ॥ भक्त
नाहीं कलिकाळा ॥ तुळसी पूजनेसी ॥ ७८ ॥

माहिती— अपूर्त.

२४१० श्री तुळसी महात्म्य विठ्ठलदासु

अरा. नं. श्री जगसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ६२

अनु. क्र. अं. २१३ ग्रंथसंख्या छापी

वर्ग. क्र. अं. २०

माहिती— शिथिल आहे. अध्याय १-१४.

२४११ श्री काशीक्षेत्र महात्म्य अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें १४५

अनु. क्र. अं. २१५ ग्रंथसंख्या १०५०

वर्ग. क्र. अं. २१

माहिती— अपूर्त. पानें २८, ४२, ६१ ते ७४, ७७, ७८ व १३६
नाहीं. श्री व्यासोक्त क्षेत्र महिमा.

२४१२ श्री शिवलीलामृत मयूरकृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ११२

अनु. क्र. अं. २१७ ग्रंथसंख्या ९५०

वर्ग. क्र. अं. २२

माहिती— अपूर्त आर्याबद्ध.

अध्याय १ ते १७. यांत अध्याय १, ९ आणि १७ यांत काहीं पानें नाहीं. ग्रंथ अपूर्त आहे.

२४१३ धनुर्मास महात्म्य गोविंद कवी
(अध्याय २१)

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बंडल. नं. — पानें ५

अनु. क्र. अं. २१८ ग्रंथसंख्या ६०

वर्ग. क्र. अं. २३

आरंभ — ।। पुरुछेपत् मेधांचा संवाद ।। अग्नि दिव्यें शिवें सुबद्ध ।।
।। वारिल्या ह्मणाल्यावरी धुंद ।। पुसे स्वछंद दधिषाल ।। १ ।।

सेवट — ऐसे दधिपाल केला प्रश्न ।। ह्मणोनी दोटाईं दोघे जण ।।
सविस्तार कथिती सुज्ञाण ।। तेंच भाषणें गोविंद कवी ।।

माहिती— श्रीमदाग्नेय पुराणोक्त धनुर्मास माहात्म्ये दधिपाल कृष्ण संवाद ।।

२४१४ श्री सोपान देव समाधी श्री नामदेव

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बंडल. नं. — पानें ९

अनु. क्र. अं. २३१ ग्रंथसंख्या ४०

वर्ग. क्र. अं. २४

आरंभ — श्रीगणेश शारदा स्तवनानंतर ।। नमो आग्नित गुणा ।। नमो आग्नेध्याना ।। नमो कली विध्वंस गहना ।। कलापहा ।।

सेवट — नामा ह्मणे स्तवन ॥ सोपानदेव केले परिपूर्ण ॥ मग बोलै जग-
ज्जीवन तयाप्रती ॥

माहिती— उत्तमप्रति. मुखपत्रावर वेलदारी सुंदर चित्र आहेत.

२४१५ श्री सोपान देव समाधी श्री नामदेव

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ७

अनु. क्र. अं. २३६ ग्रंथसंख्या ३५

वग. क्र. अ. २५

माहिती— अपूर्त. पानें ६ नाहीं.

२४१६ सावित्री आख्यान अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें २३

अनु. क्र. अं. २४० ग्रंथसंख्या १५०

वर्ग. क्र. अं. २६

माहिती— अपूर्त. पानें ३ ते २५ च आहेत. इतर पानें नाहींत.

२४१७ राधा भुजंग वामन पंडित.

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं — पानें ५

अनु. क्र. अं. २४२ ग्रंथसंख्या ९०

वर्ग. क्र. अं. २७

आरंभ — हरीच्या वियोगाग्नि संताप राधा ॥ न सोसुनीयां आठवी स्वापराध ॥ सखी येक दूती प्रिया फार तीची ॥ वहु शाहणी मूर्ति ते भारतीची ॥ १ ॥

सेवट — ह्मणोनीच वर्णी तसे वामनाची ॥ असी वैखरी हेचि सेवामनाची ॥ अहो चाळितो जो हृषीकेश वाचा ॥ असा निर्मिला ग्रंथ त्या केशवाचा ॥ ५३ ॥

माहिती— कथा वर्णिली हे भुजंग प्रयातें ॥ असे वर्णिलें जेथ राधाप्रिया तें असे नाम राधाभुजंग प्रबंधा ॥ हरिकिर्णनें वर्णने क्षिप्र बंधा ॥ ५४

मुखपत्र नाहीं.

२४१८ भामाविलास वामनपंडित

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ५

अनु. क्र. अं. २४३ ग्रंथसंख्या ९०

वर्ग. क्र. अं. २८

आरंभ — लतास त्या अंकीं खग गमनमकामरु तरु ॥ तरु ह्याति तो श्रीपती भवनदी पार उतरूं ॥ धरी लक्ष पक्षी करतळयुगी पाद— युगळा ॥ गळा रत्न घ्यावा द्रुम गरुड संयुक्त सगळा ॥ १ ॥

सेवट — प्रकाशिता देउनी सत्यभामा ॥ तोची ते ते आजि सत्यभामा ॥ वाचांश तो तो हरी वामनाचा ॥ आत्मा ठसा हा बरवा मनाचा ॥ ४७ ॥

माहिती— भावें प्रभा केवळ चित्स्वरूपें ॥ मा शक्ति शक्ति वरीजे विरूपें ॥ भामा विलास प्रभु नाम याचे ॥ ठेवी असे कृष्ण अनामयाचे ॥

२४१९ संत विजय श्रीमहीपती

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बंडॅल. नं. — पानें ५९

अनु. क्र. अं. २४५ ग्रंथसंख्या ११७५

वर्ग. क्र. अं. २९

माहिती— अपूर्त अध्याय १ ते ६. अध्याय साहावा अपूर्त. पानें फार जीर्ण झाले आहेत. मुखपत्र नाहीं ॥

२४२० श्री हरिविजय श्रीधरस्वामी

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बंडॅल. नं. — पानें ३१

अनु. क्र. अं. २४६ ग्रंथसंख्या ७५०

वर्ग. क्र. अं. ३०

माहिती— अपूर्त. अध्याय २, ३ व २० च आहेत. यांत वीसावा अध्याय अपूर्त. अध्याय ३ त. पानें ८ नाहीं.

२४२१ श्री शिवभक्त महात्म्य श्री मोरेश्वरसुत दादा व्यास

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बंडॅल. नं. — पानें २७१

अनु. क्र. अं २४९ ग्रंथसंख्या ५२५०

वर्ग. क्र. अं. ३१.

माहिती— अपूर्त. अध्याय ७ ते ४५ मात्र आहेत. ग्रंथ फार शिथिल आहे.

२४२२ श्री भक्ति लीलामृत श्री महिपतीस्वामी

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांचा देणगी.

बर्नेल. नं. — पानें ७१

अनु. क्र. अं. २५० ग्रंथसंख्या १८५०

वर्ग. क्र. अं. ३२

माहिती— अपूर्ण. १ ते ४ व ११ ते १३ च आहेत.

२४२३ पंढरी महात्म्य अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ३ ते ५९

अनु. क्र. अं. २५६ ग्रंथसंख्या छापी

वर्ग. क्र. अं. ३३

माहिती— अपूर्ण.

२४२४ तुळसी महात्म्य कोनेरी सुत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल नं — पानें ५

अनु. क्र. अं. २५७ ग्रंथसंख्या ६०

वर्ग. क्र. अं. ३४

आरंभ — सूत ह्मणे शौनकादिकां ।। प्रात:काळी उठोनी जो कां ।। तुळसी कीर्तन करी निका ।। भवाब्धी धोका नाहीं तयासी ।। १ ।।

सेवट — ह्मणोनी शौनकादिकांसी ॥ कथा सांगे सूत ऋषी ॥ कोनेरी तनय आदरेंसी ॥ श्रोतयांसी विनवितसे ॥

माहिती— स्कांद पुराणोक्त असे.

२४२५ सूर्य पुराण (हिंदुस्थानी भाषा) तुळसीदास

अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ३५

वर्नेल. नं. — पानें १२

अनु. क्र. अं. २६० ग्रंथसंख्या २००

आरंभ — अध्याय १-श्री गणेश स्तवनानंतर - अथ सूर्यपुराण लिख्यते ॥ दोह ॥ वंदौ चरण हृदय धरी श्रीपती गौरी गणेश ॥ तुळसी दास कहते सुज सवर कथा दिनेश.

सेवट — अध्याय ८ - ××× ॥ गोवर पंडके होई रहईकु आर माडके एहि विवहारा ॥ वंदन खडके करे अहाग ॥ इति श्री सूर्य महात्मे महा पुराणे व्रत विधिवरणोनाम अष्टमोध्याय: ॥ ८ ॥

माहिती— अध्याय ८- स ववादः- अ. १. वांझ पुत्र पावन. अ. २. कुष्टिकायदान. अ. ३. अंधो लोचन पावन. अ. ४. राजा परिक्षित नारद कन्या श्रीपहिन्हो नाम. अ. ५. नारदशाप-वरण. अ. ६. नारद जज्ञ शोभावरण. अ. ७. कलंकी अवतार वरण. अ. ८. व्रतविधिवरण ऐसें अध्याय आठ आहेत. तृतीय पानें अर्धाभाग कोरी.

२४२६ तंजपुरी महात्म्य शेष

अरा. नं. श्री कृष्णस्वामी महाडीकराव देणगी.

वर्नैल. नं. — पानें ११०

अनु. क्र. अं. २६८ ग्रंथसंख्या २२६२

वर्ग. क्र. अं. ३६

आरंभ — जय जयाजी गजवदना विघ्नहरा एकरदना ॥ सकळ विद्येचीया सदना ॥ नमो मदनारी प्रिय पुत्रा ॥ १ ॥

सेवट — ह्मणोनी श्रोतयां प्रती ॥ शेष करीतसे विनती ॥ वक्ता श्रोता श्रीरघुपती ॥ निरहंकृती गुरु रूपें ॥

माहिती— श्री भविष्योत्तर पुराणोक्त उमामहेश्वर संवादें तंजपुरी महात्म्य अध्याय ३०. श्लोक १६. वोव्या १७३०.

अध्याय ३० स वयाज. अ. १-२. पार्वती प्रश्न

अ. ३. बृहदीश्वर महात्म्य. अ. ४. चोळ कैंकर्य करणं.

अ. ५-७. कुलोत्तुंग चोळ चरित्र. अ. ८. द्रक् चोळ शशिशेखर चोळ चरित्र. अ. ९. शिवलिंग चोळ, वीरचोळ चरित्र. अ.१० करिकाल चोळ हरदत्ता चार्य. अ.११. हरदत्तस्वप्नकथनं अ. १२. हरदत्ताचार्य वाक्य. अ. १३. काली वर. अ. १४. बृहदीश्वरलिंग नयनं. अ. १५. शिवलिंगप्रतिष्टा. अ. १६. बृहदीश्वर कुंभाभिषेक. अ. १७. करिकाल चोळाख्य शिवसारुप्यावाप्ति ॥ अ. १८. भीमचोळ चरित्र. अ. १९. राजेंद्र चोळ चरित्र. अ. २०. कोंकणेश्वर महात्म्य वीरमार्त्तांड चोळ चरित्र अ. २१. वीरमार्त्तांड चोळ चरित्र. अ. २२. कीर्तिचोळ कृत कार्तवीर्य स्तवनं. अ. २३. कीर्तिचोळ चरित्र. अ. २४. कनक चोळ चरित्र. अ. २५. सुंदरचोळ ब्रह्महत्यागमनं. अ. २६. सुंदर चोळ चरित्र. अ. २७. सुंदर चोळास्य मध्यार्जुन ब्रह्महत्या विमोचनचरित्र. अ. २८. कालकालाख्य चोळ कैलास प्राप्ती. अ. २९. भद्र चोळ चरित्र. अ. ३०. चोळखंड वर्णनं.

अध्याय ३०· सेवट- इति श्री भविष्योत्तर पुराणें जंबुद्वीपोद्भवे दक्षिणकांडे उमामहेश्वर संवादे चोळखंड वर्णनंनाम त्रिशंति प्रसंग
काळ :- पानें ३. ××× जेथें भोंसलवंश संभूत ॥ प्रतापसिंव्ह विख्यात ॥ तयाचापुत्र गुणवंत ॥ राजा पुनित अमरसिंव्हेंद्र ॥ ३८ ॥ दया सत्यशीलवंत ॥ चतुरंग दळेंसीं समवेत ॥ विक्रमी सज्जन समावृत ॥ राज्यकरीत पुत्र पौत्रेंसी.
या विना इतर काहीं माहिती काळाविषई मिळतनाहीं ॥
पानें ९४ ते ११० पुनर्लिखित.

२४२७ श्री पांडुरंग महात्म्य श्रीधरस्वामी

अरा. नं. श्री कृष्णस्वामी महाडीकराव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ५८

अनु. क्र. अं. २६९ ग्रंथसंख्या १०५०

वर्ग. क्र. अं. ३७

माहिती— अध्याय १०. मुखपत्रावर श्री विठ्ठल आणि पुंडलीकाची सुंदर चित्र आहेत.

२४२८ श्री रुक्मिणी स्वयंवर एकाजनार्दनस्वामी

अरा. नं. श्रीमहादेवराव घाटगे यांची देणगी. अरा-७.

बर्नेल. नं. — पानें २३८

अनु. क्र. अं ३२४ ग्रंथसंख्या २२००

वर्ग. क्र. अं. ३८

आरंभ — अं. १ ॥ ॐ नमो जी कृष्णनाथा ॥ गणेश सरस्वती नामें धरिता ॥ तूंची तू कुलदेवता ॥ कवण आतां प्रार्थु ॥

सेवट — अं. १८ ॥ येकाजनार्दनीं ॥ जनादन येकपणीं ॥ जैसें जान्हवीचें पाणी ॥ मनकर्णी तीर्थराज ॥ ८४ ॥

माहिती— प्रसंग १-८ आहेत. सुंदर ग्रंथ. आद्यंतपत्रे शिथिल आहेत. अध्याय १८- पानें ११- वोवी ८२. वाराणसी महापुरी मणिकर्णिकेचे तीरीं ॥ राम जयंतीमाझारीं ॥ ग्रंथ निर्धारीं संपला ॥ ८२ ॥

काल :- अ. १८. पानें ११. प्लवंग नाम संवत्सरी ॥ मार्गशीर्षवद्य नवमीं बुधवासरी ॥ लेखन संपूर्ण पहिले प्रहरी ॥ भावें श्रीहरी अर्पिल ॥

२४२९ कुंभकोण महात्म्य राघव सुत

सं अरा. नं. श्री महादेवराव घाटगे यांची देणगी. अरा-७.

बर्नेल. नं. — पानें ३९

अनु. क्र. अं. ३२५ ग्रंथसंख्या १२००

वर्ग. क्र. अं. ३९

आरंभ — जय जय श्री विघ्नहरा ॥ गीर्वाण चक्राचा तू तुरा ॥ श्रीजगदेवस अवडता बरा ॥ तैसा स्वशंकराप्रतिहीं ॥ १ ॥ अ. १.

सेवट — जो अशा तीर्थी करील स्नान ॥ तो सर्व पापमुक्त होऊन ॥ अंतीं शिवलोकीं पावे सन्मान ॥ यांत अनुमान लेश नाहीं ॥

माहिती— अध्याय संख्या १२. वोव्या संख्या - ७५९.

कर्ता :- अ. १२. पानें. ३९. ××× ॥ श्रीं कुंभकोण महात्म्य प्रथित ॥ ब्रह्मांड पुराणीं व्यास कथित ॥ त्याचा टीका निर्मी राघव सुत ॥ प्राकृत भाषेंत सम्यक ॥ ६१ ॥

काल :- शक सतराशे छपन्न ॥ जय वत्सर वद्य श्रावण ॥
रेवतीभ सोमवारी शोभन ॥ ग्रंथपावन पूण झाला ॥ ६२ ॥
लेखक :- वजारतमाफ राघोजी सर्जेराव घाडगे यांचे पुत्र हीरू-
स्वामी घाडगे यांचे पुस्तक चिमणाजी मोहिते यांचे पुत्र सखा-
राम मोहीते यांच्या स्वहस्ते लेखनें संपूर्ण करिजेले.

२४३० कुंभकोण महात्म्य राघव सुत

अरा. नं. श्री महादेवराव घाडगे यांची देणगी. अरा-७.

बंनॅल. नं. — पानें ४२

अनु. क्र. अं. ३२६ ग्रंथसख्या १०५०

वर्ग. क्र. अं. ४०

माहिती— नं. ३२५ प्रमाण. आद्यंत पत्र नाहींत.

२४३१ गया महात्म्य अनाम

अरा. नं. श्री महादेवराव घाटगे यांची देणगी. अरा-७.

बंनॅल. नं. – पानें १४

अनु. क्र. अं. ३२७ ग्रंथसंख्या ४५०

वर्ग. क्र. अं. ४१

आरंभ — श्री विघ्नहराचे चरण ॥ आदौ वंदिले म्यां शरण ॥ बुद्धी ज्ञानाचे
शरण ॥ आभरण अविघ्नाचे ॥

सेवट — पंचमोध्याय अपूर्त.

माहिती— अपूर्त ग्रंथ.

२४३२ गोपीचंदाख्यान अनाम

अरा. नं. श्री महादेवराव घाडगे यांची देणगी. अरा-१०.

बर्नेल. नं. — पानें ७

अनु. क्र. अं. ३५१ ग्रंथसंख्या ७७

वर्ग. क्र. अं. ४२

आरंभ — चक्रवर्ती त्रैलोक्य चंद्राजा ।। मैनावती ते येक तया भाजा ।।
व्रत तप आनेक पुत्र भाजा ।। करी भावें अखंड देव पूजा ।।१

सेवट — कोण तुझा वाढीले नित्य जेऊं ।। कोण तुझा घालिती नित्य नाहुं
आई माई घालिती नित्य जेऊं ।। गंगा यमुना घालिती झणे
नित्य नाहुं ।।

माहिती— अपूर्त व अति जीर्ण. वोवीवद्ध आख्यान.

२४३३ देवी महात्म्य. उत्तम चरित्र श्री मयुरेश्वर विरचित.

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बर्नेल. नं. – पानें १९

अनु. क्र. अं. ३९५ ग्रंथसंख्या ३७५

वर्ग. क्र. अं. ४३

आरंभ — श्री विद्यावलमत्तप्रभु शुंभ निशुंभ जाहते होते ।।
शक्रादि लोकपाळ करवी चंद्र पदासी लाहलेहो ते ।। १ ।।

सेवट — कादंविनी शिवेनें जो शतमख मुख तयाहिं लेखा तें ।।
चातक मयूर ऐसे तच्चरितहीं अमृत वर्षले खाते ।। ४० ।।

माहिती— ६ अध्यायांचा ग्रंथ. आर्यावृत्त. आर्या संख्या २२८.

२४३४ मदालसोपाख्यान श्री मयूरेश्वर विरचित

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बंडल. नं. — पानें ३३

अनु. क्र. अं. ३९९ ग्रंथसंख्या ४००

वर्ग. क्र. अं. ४४

आरंभ — श्री शंभूच्या प्रसादें झाली लिजगीं मदालसा मान्या ॥
बुधहो या साध्वीचे सेउनी सुयश न वदाल सामान्या ॥ १ ॥

सेवट — हे सच्चरित्र भावें गावें नि:शेषहीं अव सराया ॥
उच्चपदीं वेधाया तेथुनी कल्पक्षयीं न घसराया ॥ ३२३ ॥

२४३५ संत विजय-समर्थ जन्म चरित्र महिपती

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-४.

बंडल नं — पानें ५१८

अनु. क्र. अं. ४१४ ग्रंथसंख्या ६७५०

वर्ग. क्र. अं. ४५

आरंभ — अध्याय १. जय लीला विग्रही पुरुषोत्तमा ॥ पांडुरंगा रुक्मिणी अंतर्यामा ॥ तुझा पार न कळेचि निगमा ॥ आत्मारामा जगद्गुरो ॥ १ ॥

माहिती— अध्याय संख्या २७ स बयाज :—

| अध्याय | पानें | वोव्या | विषय |
|---|---|---|---|
| १. | २० | २०७ | श्री समर्थ जन्म चरित्र |
| २. | १९ | १८६ | श्री समर्थास हनुमंत दर्शन |

| अध्याय | पानें | ओव्या | विषय |
|---|---|---|---|
| ३. | १४ | ११२ | श्री समर्थास मोहिनी क्षळण कथा ॥ |
| ४. | १४ | १४६ | शिवाजी महाराजास अनुग्रह |
| ५. | १४ | १९० | श्री समर्थ केलेली समाराधना |
| ६. | २० | २१६ | ध्यानस्थ समर्थ |
| ७. | १६ | १४७ | श्री समर्थ कीर्तनकार |
| ८. | १२ | १३६ | शिवाजींचे गुरूभक्ती |
| ९. | १६ | १७६ | समर्थांचे पंढरी यात्रा |
| १०. | १९ | १४२ | गरुडपारीं समर्थांचे कीर्तन |
| ११. | १४ | १७६ | माहोलीस आगमन, शिवरायांसीभेट व श्रीसमर्थांचे तीर्थाटण. अंबाजी आख्यान |
| १२. | १९ | १९४ | अंबाजी आख्यान |
| १३. | २० | २०६ | वेणाबाई चरित्र |
| १४. | १९ | २१५ | बहिणाबाई चरित्र |
| १५. | १६ | १५४ | चांपळखो-यांत श्रीरामप्रतिमास्थापन |
| १६. | २६ | २०६ | चांपळखो-यांत मारुतीची प्रतिष्ठा |
| १७. | २२ | १९२ | चांपळयांत श्रीरामनवमी उत्सव |
| १८. | २४ | २२९ | रामनाम महिमा वर्णन व हनुमंत जयंती उत्सव |
| १९. | २० | १८४ | उद्धव आणि केशवस्वामींचे चरित्र |

| अध्याय | पानें | ओव्या | विषय |
|---|---|---|---|
| २०. | १९ | १५१ | जयत्पाळ चरित्र |
| २१. | २३ | १७१ | चौदा ब्रह्म मलयगंधर्व उद्धार |
| २२. | २६ | १७२ | जयरामस्वामीचे घरी गोपाळकाला |
| २३. | २० | १४९ | आकाबाईचे कीर्तन |
| २४. | २० | १४९ | निंबराज बाबा पैठणकरांचे कीर्तन |
| २५. | १९ | १५२ | त्रयोदशाक्षरी मंत्र महिमा |
| २६. | २० | १९५ | मुमुक्षु व साक्षात्कार बावाजी बावांचे चरित्र |
| २७. | १९ | १८८ | अध्यात्म वृत्ती बोध |

२४३६ भक्त विजय महिपती

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा ६.

बंडल. नं. — पानें ४५७

अनु. क्र. अं. ४१६ ग्रंथसंख्या ११६५१

वर्ग. क्र. अं. ४६

आरंभ — जय जय भीमा तीर विहारा ॥ भक्तवत्सला कृपासागरा ॥
व्यापुनीयां चराचरा ॥ असती निराळा सर्वातीत ॥ १ ॥

सेवट — अवीट आवडी धरोनी चित्तीं ॥ तुझीया दासाची वर्णावी स्तुती ॥
हेंचि उचित महिपती ॥ मागे निजप्रीती निरंतर ॥ ३१९ ॥

माहिती— अध्याय संख्या ५७. अति शिथिल ग्रंथ.

लेखन काल :- शके सोळाशे चौऱ्यांअशी ।। चित्रभानुनाम संवत्सरासी ।।
वैशाख वद्य द्वादशीसी ।। ग्रंथ सित्धीस पावला. पानें ११.
वोवी ३१२.

स्थळ :- प्रवर पासुनी दक्षणेस ।। ताहारावाज गांव पांच कोस ।।
भक्तविजय अति सुरस ।। जाहला असे ते ठांई ।। पानें ११.
वोवी ३१३.

गुरु :- नमुं सद्गुरु तुकाराम ।। जेणें निरसिला भवभ्रम ।।
आपुले नामी देवोनी प्रेम ।। भव बंधन निवारिले ।। ३ ।। पानें १

२४३७ श्री नळ दमयती स्वयंवर. वही अनाम

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-७.

बंडॅल. नं. — पानें २६

अनु. क्र. अं. ४१७ ग्रंथसंख्या ४६८

वर्ग. क्र. अं. ४७

आरंभ — पुण्यश्लोक नृपावळींत पहिला होऊनी जो राहिला ।। जो राजा असे तो समस्त महिला विश्रांतीसा साहिला ।। व्यासोर्के अवगाहिला बुध गुणीं नानागुणीं जाइला ।। जो नाम नळ तत्कथौघ लिहिला जो पाहिजे पाहीला ।। १ ।।

सेवट — राजा निरोपास येतां दमयंती समवेता ।। आपल्या नगरासी येतां नांदे आनंद भरे ।।

माहिती— अति शिथिल वही.

२४३८ चरित्रांची वही. रामसुतात्मजा

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-७.

बनॅल. नं —　　　　पानें ४२

अनु. क्र. अं. ४१८　　　　ग्रंथसंख्या ५९०

वर्ग. क्र. अं. ४८

आरंभ — द्रौपदी वस्त्रापहरण :-

जना निमित्य त्या घनें भूमीसी तोयें सांडणें ॥

घडे तयासी तो येका येरां जनासी मागणें ॥ १९ ॥

सेवट — सीता स्वयंवर :-

जनक नृपवराचे कार्य सिद्धीस जावें ॥ सहज निज वळाचें कौतुक दाखवावें ॥ परिसत जगदात्मा उठीला तेंचि वेळे ॥ दिनकर पळ तैसें झेलीले च्यापलीले ॥

माहिती— दोनीहीं चरित्र अपूर्त. द्रौपदी वस्त्रापहरण श्लोक १ ते १८ पावतो नाहींत. सीता स्वयंवर : श्रीरामचंद्रानें शिव धनुष्य भंग केला पर्यंतच आहे. इतर भाग नाहींत. अपूर्त.

२४३९　चरित्रांची वही　　　　अनाम

अग. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-७.

बनॅल. नं. —　　　　पानें ३९

अनु. क्र. अं. ४२०　　　ग्रंथसंख्या ५२५

वर्ग. क्र. अं. ४९

माहिती— या वहींत-१. द्रौपदी वस्त्रापहरण. २. ध्रुव चरित्र. ३. कटि बंध. ४. गोराकुंभार चरित्र. ५. कटि बंध. ६. सुदाम चरित्र. ७. प्रल्हाद चरित्र. ८. पदें वगैरे आहेत.

॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रथांची बयाजवार यादीचे अनुबन्ध

## वर्ग—६.

## स्तोत्र

नंबर २४४० — २४७१.

२४४० श्री भीमरूपी स्तोत्र श्री रामदास

सं. अरा. नं. ५ वर्ग. क्र. अं. १

बर्नेल. नं. ८९२५ पानें. २

अनु. क्र. अं. ४३ ग्रंथसंख्या २०

आरंभ — श्रीरामकर्ता ॥ श्रीरामदास गुरुभ्यो नमः ॥ श्री बलभीमाय नमः ॥ भीमरूपी महारुद्रावज्रहनमान्मारुती ॥ वनारी अंजनी सुता रामदूता प्रभंजना ॥

सेवट — रामदासीं अग्रगण्यु कपिकुळांसी मंडनु ॥ रामरूपीं अंतरात्मा दर्शनें दोष नासती ॥ १६ ॥

इति श्रीरामदास विरचिते भीमरूपी स्तोत्रं संपूर्ण ॥

माहिती— दोनी पत्र जीर्ण आहेत.

२४४१ श्री वेंकटेशस्तोत्र श्रीकर

सं. अरा. नं. ४४ वर्ग. क्र. अं. २

बर्नेल. नं. १३६९९ पानें २४

अनु. क्र. अं. ४६ ग्रंथसंख्या ६५

आरंभ — ॐ नमोजी हे रंभा ।। सकळां आधि तूं प्रारंभा ।। आठउनी तुझी स्वरूपशोभा ।। वंदन भावें करीतसें ।।

सेवट — तेथें नाहीं देहभाव ।। अवघा चतुर्भुज देवाधिदेव ।। त्याचे चरणीं ठेवोनीयां भाव ।। इच्छाप्रसाद मागावा ।।

माहिती— श्री वराह पुराणोक्त वेंकटेशगिरि माहात्म्ये श्रीवेंकटेश प्रार्थना शतक. वोवी बद्ध. ११० वोव्या आहेत. ११० व्या वोवींत-
।। प्रभव नाम संवत्सर ।। शुक्लपक्ष दशमी निर्धार ।।
।। वैशाख मास भृगु वासर ।। ग्रंथ श्रीकर संपूर्ण पैं केला ।।
ह्मणून आहे. यावरून श्रीकर ह्मणणार हा शतक लिहीला असावा हा भास होतो. ग्रंथ लहान असून सुन्दर आहे.

२४४२ भजन संप्रदाय विश्वनाथपंत

सं अरा. नं. अमानत् अरा-१६ वर्ग. क्र. अं. ३

बर्नेल. नं. १३९५१ पानें १२

अनु. क्र. अं. ६२ ग्रंथसंख्या ६५

आरंभ — ।। श्री गणेशस्तवन.

सेवट — शंभो महादेव शंभो महादेव शंभो महादेव सांब प्रभो ।। हर हर शंभो महादेव सांब प्रभो ।।

15

माहिती— ग्रंथ जीर्ण आहे. पानें झडत आहेत

२४४३ विज्ञापना पद्धती नारोजी पण्डित

सं. अरा. नं. १९ वर्ग. क्र. अं. ४

बर्नेल. नं. १३९८३ पानें ९

अनु. क्र. अं. ६६ ग्रंथसंख्या १७०

आरंभ — विज्ञापनाया मज शक्तिनाहीं ॥ मी बोलिलों बाळपणेंच काहीं
तेहीं क्षमावें करुणा विधीनें ॥ मला पाहावें करुणे क्षणातें ॥

सेवट — मी रक्षितों हे शरणागताला ॥ केली प्रतिज्ञा आइसी कश्याला ॥
त्या सत्य वाक्या न चुकोन रामा ॥ पाळी आह्मां पूर्ण करूनी कामा

माहिती— श्री समर्थांचें मनाचे श्लोकाप्रमाणेंच हा ग्रंथहीं रचियेलें आहे. देवापासी करुणा कसी भाकावी ह्मणुन ७१ पद्धती दिलें आहे. "नारोजी पण्डितानें मां भक्त्या विज्ञापनां कृतां ये पठन्ति नरा भक्त्या सर्वान्कान्वाप्नुयु:" ह्यावरून नारोजी पण्डितानें हे विज्ञापना पद्धती ग्रंथ रचविण्यांत आलें ह्मणायाचें सिद्ध होतें. हा नारोजी पण्डितांचे पूर्व चरित किवां गुरु परंपरा विषई माहिती काहीं मिळत नाहीत.

२४४४ श्री समर्थ स्तवन श्री मेरुस्वामी

सं. अरा. नं १९ वर्ग. क्र. अं. ५

बर्नेल. नं. १३९८४ पानें ४

अनु. क्र. अं. ६७ ग्रंथसंख्या २०

आरंभ — परंधाम चिद्रूप व्यक्तीसी आलें ॥ समर्थ स्वरूपचि विख्यात झालें ॥ १ ॥ परब्रह्म प्रत्यक्ष या लोक दैवें ॥ नमो सद्गुरु राम दासासी भावें ॥

सेवट — जिणोनी सुखें घोर संसार वैरी ।। समर्थानुकंपेसीं ज्ञानाधिकारी ।। विरक्तीसीं भक्ती मेरुकरावें ।। नमो सद्गुरु रामदासासी भावें ।।११

माहिती— श्री मेरुस्वामी हे श्री समर्थ सांप्रदाई असून श्री समर्थ शिष्यातले दुसरे पिढीचे होय. यांचे गुरु श्री अनंतमौनी रामदासी यांचे वर्णन प्रत्येकठाई प्रसिद्धच आहे. यांचे रहित्रास तंजावरास पूर्वेकडील मन्नाग्गुडी होय.

२४४५ **श्री समर्थाष्टक** **शंकर**

सं. अरा. नं. १९ वर्ग. क्र. अं. ६

बर्नेल. नं. १३९८५ पानें ४

अनु. क्र. अं ६८ ग्रंथसंख्या २०

आरंभ — ।। विख्यात जो कलियुगीं निज निर्विकारी ।। झाला सगुणरूप मानववेषधारी ।। नामामृतें करीत गर्जन पुण्यखाणी ।। श्रीराम दास महाराज वदा स्व वाणी ।।

सेवट — तो दासबोध निजग्रंथ विचित्र राशी ।। ग्रंथांतरें बहुत तो श्रुति संमतीशी ।। भावार्थ युक्त वदला जरी मोक्षदानी ।। श्रीरामदास महाराज वदा स्व वाणी ।। ८ ।।

माहिती— ।। श्लोक :- श्रीरामदास निज अष्टक सुप्रीतीनें ।। वाचे त्रिकाळ नर जो मन सन्मतीनें ।। स्वानंद रूत्र पदवी परि तोचि पावे ।। ध्यानो मुनी त्वरित शंकर प्रेम भावें ।। ९ ।।

२४४६ अष्टपदी जयदेवकवि

सं· अरा. नं. ८ वर्ग. क्र. अं. ७

बर्नेल. नं १४८४२(b) पानें १३

अनु. क्र. अं. ८३ ग्रंथसंख्या २००

आरंभ — × × × × विवाह विधी करून सहज ॥ भूचक्र नगर जे निज ॥ त्याप्रति तुज आणिलें

सेवट — हे माझे अंतःकरण कृष्णाच्या सौन्दर्यादि गुणानें वोढिलें होत्सातें उत्कंठातिशयानें आपणेंच × × ॥

माहिती— अक्षर स्पष्ट नाहीत. सेवटच्या पत्रांत असें लिहिलें गेलें आहे कीं; "शृंगार रसभरित हरिगुण वर्णन प्रवृत्तया अष्टपदी गीत करून श्री कृष्णपद शेवक कवि जयदेव कवीचे ठाई कलियुगाचा रीत न राहो" यावरूनहीं अष्टपदी जयदेव कविकृत ह्मणून कळून येतें. पत्र संख्या बरावर नसून प्रकीर्ण आहेत. कुल्लास पानें १३ आहेत.

२४४७ श्री भवानी अष्टोत्तर नामावळी अनाम

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ८

बंनेल. नं. — पानें ३

अनु. क्र. अं. १०१ ग्रंथसंख्या २५

माहिती— भाव नाम संवत्सर अधिक भाद्रपद शुद्ध दशम्यां राक्षस भुवन कमलाकर भट्टस्य सूनु रामेण शंकर नारायण सन्निधौ लिखित मिदं पुस्तकं समाप्तं.

२४४८ श्री गोस्तवराज अनाम

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ९

बंनेल. नं. — पानें ७

अनु. क्र. अं. ११० ग्रंथसंख्या १५०

आरंभ — श्रीदे धेनु माये ॥ ओरसुनीं ॥ मोदें तूं ॥ धांवत ये ॥ १ ॥

सेवट — नव नव भाग्यो ॥ दय त्याच ॥ नित्य घडे ॥ भव्य फळीं तो चढतो ॥ ८८ ॥

इति श्री गोस्तवराजः संपूर्णः ॥ सांबशिवः प्रीयतां ॥

माहिती— प्राकृत भाषा कविता समावृत्त - लय ताळ नसे

लेखक व काळ :- क्रोधन पुष्य चतुर्थी स्थिर वासरे लिखितं. भानुवासरे समाप्तं ॥ छ ॥ कवि गोविन्दः ॥ एतत ॥ तंजाउर सोमनाथी वांडावास ॥

२४४९ श्रीराम पंचरत्नक स्तोत्र अनाम

सं. अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. १०

बर्नेल. नं. — पानें बंद-१

अनु. क्र. अं १३० ग्रंथसंख्या ८५

२४५० मारुती स्तोत्र व भीमाष्टक श्रीरामदास कृत

अरा. नं. श्री गोपाळकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ६

अनु. क्र. अं. १६३ ग्रंथसंख्या छापी.

वर्ग. क्र. अं. ११

आरंभ — मारुती स्तोत्र.

सेवट — भीमाष्टक.

माहिती— पंचदशश्लोकी श्री मारुती स्तोत्र.

२४५१ शनैश्वर स्तोत्र महिपती

अरा. नं. श्री गोपाळकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

वर्नेल. नं. – पानें ४९

अनु. क्र. अं. १६४ ग्रंथसंख्या ३५०

वर्ग. क्र. अं. १२

आरंभ — ॐ नमो जी गणनायका ।। एकदंता वरदायका ।।
स्वरूप सुन्दरा विनायका ।। करी कृपा मजवरी ।।

सेवट — इति श्रीशनैश्वराची कथा ।। त्याचा तोचि वदविता ।।
आपुली तो माईक वार्ता ।। करविता श्रीपांडुरंग ।।

माहिती— गुजराथ भाषेची कथा ।। नवग्रहाची तत्वता ।। ही ऐकतां एक चित्ता ।। संकट व्यथा न बाधिती ।। ५ ।।....पानें-२. यावरून गुजराथ भाषची विक्रम चरित्रांतुन घेतलेला भाग येवढें कळूयेतें या ग्रंथांत नवग्रहांपैकीं प्रत्येकाची कथा सांगून विशेषत: शनैश्वराची कथा विस्तारेंकरून सांगीतलें आहे.

काल:- इदं पुस्तकं बहुधान्य संवत्सर भाद्रपद शुद्ध २ गुरु वासरे वेंकाजी जनार्दन पौलेग वकाजी रामाजी लिखितं.

२४५२ श्री माधवस्तवराज अनाम

अरा. नं. श्री नागासामीराव शिर्केगव यांची देणगी.

बर्नेल. नं. – पानें ७

अनु. क्र. अं. १८८ ग्रंथसंख्या ३५

वर्ग. क्र. अं. १३

आरंभ — शंखचक्र पीतांबरधारी ॥ लीला नाटकी वैकुण्ठ विहारी ॥
तयासी आठवावें अंतरीं ॥ सप्रेमभगी होवोनी ॥ १ ॥

सेवट — ऐसास्तवराज नित्य पढती ॥ अथवा चित्त देवोनी ऐकती ॥
त्यांचे मनोरथ निश्चिती ॥ वैकुंण्ठपती पुरवील ॥ २६ ॥

२४५३ श्रीमारुती स्तोत्र. दोनप्रति श्री रामदास कृत

अरा. नं. श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

बनॅल. नं. — पानें प्रति एकास-६.

अनु. क्र. अं. १८९ ग्रंथसंख्या ३३

वर्ग. क्र. अं. १४

आरंभ — संकल्प व ध्यान.

सेवट — राम रूपी अंतरात्मादर्शनें दोष नासती ॥ १८ ॥

२४५४ श्री पाण्डुरंग स्तोत्र श्री महिपतीस्वामी कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बनॅल. नं. — पानें १०

अनु. क्र. अं २१० ग्रंथसंख्या १५०

वर्ग. क्र. अं. १५

आरंभ — जय जयाजी पंढरी नाथा ॥ भक्तवत्सला रुक्मिणी कांता ॥
तूंचि माझा माता पिता ॥ बंधु चुलता गण गोत ॥ १ ॥

सेवट — दाशीं बोल लागेल तत्वता ॥ तैसें न करी पंढरी नाथा ॥
महिपती चरणीं ठेउनी माथा ॥ विनवणी अनंता करीतसे ॥ १०७

माहिती— ग्रंथ जीर्ण होत चालली आहे.

२४५५ श्री संत मालिका देवदास कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बनेंल. नं. – पानें १५

अनु. क्र. अं. २२१ ग्रंथसंख्या १८०

वर्ग. क्र. अं. १६

आरंभ — ॐ नमोजी एकदंता ॥ देवी गौरीचीया सुता ॥
करुणाकरा दयावंता ॥ लंभोदरा आदिमूर्ति ॥ १ ॥

सेवट — देवदास विनवी पुढती पुढती ॥ हे ग्रंथ केवळ भागीरथी ॥
श्रवणमात्रें उत्तम गती ॥ प्राणिमात्रांसी होय ॥ १४३ ॥

माहिती— लेखण :- क्रोधन नाम संवत्सरासी ॥ मार्गशीर्ष मासी ॥
बहुळ प्रतिपदा बुधवाराचे दिवसी ॥ पूर्णता झाली ग्रंथासी ॥

२४५६ गुरु स्तोत्र अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बनेंल. नं. — पानें १८

अनु. क्र. अं. २२३ ग्रंथसंख्या २००

वर्ग. क्र. अं. १७

माहिती— अपूर्त. पानें ४-२१ च आहेत.

२४५७ सूर्य स्तुती अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

वर्नेल. नं. –  पानें २

अनु. क्र. अं. २२४  ग्रंथसंख्या १५

वर्ग. क्र. अं. १८  अपूर्त

२४५८ आदित्य हृदय  अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. –  पानें ३

अनु. क्र. अं. २२५  ग्रंथसंख्या २५

वर्ग. क्र. अं. १९

आरंभ — ततो युद्ध परिश्रांतं समरे चिंतयास्थितं

सेवट — निशिचरपति संक्षयं विदित्वा सुरगणमध्यगतोवचक्ष्वरेति

२४५९ विज्ञापना पद्धती  अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. —  पानें १५

अनु. क्र. अं. २२९  ग्रंथसख्या १००

वर्ग. क्र. अं. २०

माहिती— अपूर्त.

२४६० श्री भक्तरत्नमालिका  श्री बाळ कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ५

अनु. क्र. अं. २३२ ग्रंथसंख्या ४०

वर्ग. क्र. अं. २१

आरंभ — श्री गणेश शारदा सद्गुरु ।। संत सज्जन कुलेश्वरु
माझा सर्वहीं रघुवीरु ।। सद्गुरु रूपें ।। १ ।।

सेवट — ऐसेमहिमान भक्तांचे ।। बाळानें वर्णिलें साचे ।।
न्यूनते पूर्ण वचनाचे ।। क्षमा केलें पाहिजे ।। ३१ ।।

२४६१ श्री भक्तमालिका श्री मेरुस्वामी कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ५

अनु. क्र. अं. २३३ ग्रंथसंख्या ३३

वर्ग. क्र. अं. २२

आरंभ — ।। अनन्य भावें सद्गुरूसी शरण जावें ।। तो सांगेल ते तूंचि करावें ।।
।। ते निज गुज्ञ नित्य हृदईं जपावें ।। मग तन्मन होउनी राहावें ।।
सस्वरूपीं ।।

सेवट — ।। अष्टोत्तर भक्तराज ।। मध्ये मेरु गुरु उद्धव जे ।। येका कवी
चरणरजे ।। सहजची मीं संताचें ।। २७ ।।

२४६२ हनुमंत स्तवन श्री समर्थ कृत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें २

अनु. क्र. अं. २३४ ग्रंथसंख्या १२

वर्ग. क्र. अं. २३

आरंभ — संकोचित बैसणें ।। पाला वरपुनी खाणें ।।
तांतडीं चावितां तेणें ।। हनुवटी हाले ।। १ ।।

सेवट — ऐसे हे रामदास ।। सवस्त्र उदास ।।
रामीं जयाचा विश्वास ।। बाणुनी गेला ।।

२४६३ श्री वेंकटेश स्तोत्र अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. – पानें ८

अनु. क्र. अं. २३७ ग्रंथसंख्या ६०

वर्ग. क्र. अं. २४

माहिती — अपूर्ते. अनेक पानें नाहीत. पानें ७ अर्धा भाग नाहीं.

२४६४ आदित्य हृदय अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बर्नेल. नं. – पानें १०

अनु. क्र. अं. २३९ ग्रंथसंख्या २५

वर्ग. क्र. अं. २५

माहिती— अपूर्ते. पानें १ ते १० च आहेत.

२४६५ शनि माहात्म्य अनाम

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी

बर्नेल. नं – पानें २०

अनु. क्र. अं. २५५ ग्रंथसंख्या छापी.

वर्ग. क्र. अं. २६

माहिती— अपूर्ते.

२४६६ श्रीरामरक्षा स्तोत्र श्री विश्वामित्र कृत

अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. २७

बर्नेल. नं. — पानें ११

अनु. क्र. अं २९० ग्रंथसंख्या २५

आरंभ — ।। श्रीरामचंन्द्राय नमः ।। चरितं रघुनाथस्य शतकोटी प्रविस्तरम् ।।
एकैकमक्षरं प्रोक्तं महापातक नाशनं ।।

सेवट — इत्येतानि जपेन्नित्यं मद्भक्तः श्रेयसान्वितः ।।
अश्वमेघायुतं पुण्यं संप्राप्नोति न संशयः ।।

२४६७ श्री अन्नपूर्णा स्तोत्रं श्री शंकराचार्य विरचित

अरा. नं. अमानत वर्ग. क्र. अं. २८

बर्नेल. नं. — पानें ३

अनु. क्र. अं. २९१ ग्रंथसंख्या १२

आरंभ — ।। नित्यानंदकरी वराभयकरी सौन्दर्य रत्नाकरी ।।

सेवट — ।। ज्ञान वैराग्य सिध्यर्थं भिक्षां देहिच पार्वती ।। ११ ।।

माहिती— ।। इति श्रीमच्छंकराचार्य विरचित अन्नपूर्णाष्टक स्तोत्रं संपूर्णमस्तु.

२४६८ श्री वेंकटेश स्तोत्र देवदास

अरा. नं. श्री महादेवराव घाडगे यांची देणगी. अरा-४.

बर्नेल. नं. – पानें २६

अनु. क्र. अं. ३०० ग्रंथसंख्या १३०

वर्ग. क्र. अं. २९

आरंभ — ।। ॐ नमोजी हेरम्बा ।। सकळां अधिं तूं प्रारंभा ।।
।। आठवोनी तुझी स्वरूप शोभा ।। वंदन भावें करीतसें ।। १०८

सेवट — ।। तेथें देह भावासी नाहीं ठाव ।। अवघा चतुर्भुज दिसे देव ।।
।। त्याचे चरणीं ठेउनीयां भाव ।। इच्छा प्रसाद मागावा ।। १०८

माहिती— कर्ता:- पानें २५.
देवदास विनवी श्रोतयां चतुरां ।। प्रार्थना शतक पठण करा ।।
जावया मोक्षाचीया द्वारा ।। काहींच न लगती सायास ।। १०६
काळ :- सुभानु नाम संवत्सर अश्विज वद्य प्रतिपदा सोमवारी
ग्रंथ संपूणमस्तु ।।

२४६९ भीमरूपी स्तोत्र अनाम

सं. अरा. नं. श्री महादेवराव घाडगे यांची देणगी. अरा-४.

बनेंल. नं. — पानें १

अनु. क्र. अं. ३०३ ग्रंथसंख्या २०

वर्ग. क्र. अं. ३०

आरंभ — भीमरूपी महारुद्रा वज्रहनुमान् मारुती ।। वनारी अंजनी सुता
रामदूता प्रभंजना ।। १ ।।

सेवट — हे हनुमानाची नावें पठण केलीयां वीरश्री आयुर्वर्धन होय.

माहिती— पान तुटक आहे.

२४७० करुणाष्टक श्री समर्थ कृत

अरा. नं. श्री महादेवराव घाडगे यांची देणगी. अरा-१०.

स्तोत्र

बर्नेल. नं. –  पानें बंद

अनु. क्र. अं. ३५२  ग्रंथसंख्या ३२

वर्ग. क्र. अं. ३१

आरंभ — अनुदिनी अनुतापें तापलों रामराया ।।

सेवट — आढळत नाहीं.

माहिती— १६ अष्टक आहेत.

२४७१ देवी माहात्म्य - आर्यावृत्त  श्री मयूरेश्वर विरचित

अरा. नं. श्री भीमराज गोस्वामी यांची देणगी. अरा-३.

बर्नेल नं —  पानें १५

अनु. क्र. अं. ३९४  ग्रंथसंख्या २७५

वर्ग. क्र. अं. ३२

आरंभ — श्रीमान् चैत्र कुलोद्भव सुरथ स्वारोपितांतरी होता ।।
तो सार्वभौमपोषी आत्म यशा हंस खग जसा पोता ।। १ ।।

सेवट — जे नटती अप्सरागण तैं मोराचे गान तो अवघटा हो
निववी यशोमृतानें वर्षुनी जाती शिवा घन घटा हो ।। ५७ ।। अ. ३

माहिती— अध्याय तीन आहेत. कुल आर्या १७९.

अध्याय बयाज:- १-मधुकैटभ चरित्र-२. महिषासुर सैन्य वध-३ महिषासुर सैन्य वध.

॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे

# अनुबन्ध

## वर्ग—७.

## व्रत

नंबर २४७२ — २४९८.

२४७२ अनंत पूजा व कथा अनाम

सं. अरा. नं. ३ वर्ग. क्र. अं. १

बंनेल. नं. ७६९० (अ) पानें. २०

अनु. क्र. अं. २९ ग्रंथसंख्या २०८

माहिती— पूजा भाग संस्कृत. कथा भाग मराठी. शकें १६०७. प्रभव नाम संवत्सरीं भाद्रपद पूर्व पक्ष प्रतिपदेच्या दिनीं हे ग्रंथ पूर्ण झाले.

२४७३ प्रा. रथसप्तमी पूजा व कथा अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. २

बंनेल. नं. ८२६२ पानें ८

अनु. क्र. अं. ३० ग्रंथसंख्या २३०

आरंभ — आतां पूजा प्रकार सांगीजे तों.

सेवट — ऐसें व्रत करणारास असाध्य काहीं नसे. इष्ट प्राप्ती होय.

माहिती— संक्षिप्त पूजा प्रकार. कथा भाग मराठींत आहे.

२४७४ प्रा. रथ सप्तमी पूजा व कथा अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. ३

बर्नेल. नं. ८२६३ पानें ८

अनु. क्र. अं. ३१ ग्रंथसंख्या २५०

माहिती— पूजेचा विधी मराठींत सांगीतलें आहे. कथा भाग मराठींत सुंदर आहे.

२४७५ रथसप्तमी निर्णय व उद्यापन पद्धती अनाम

सं अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. ४

बर्नेल. नं. ८२६४ पानें ४

अनु. क्र. अं. ३२ ग्रंथसंख्या १२५

आरंभ — आतां रथसप्तमी निर्णय सांगीजे तो.

सेवट — ॥ इति श्री ब्रह्मांड पुराणे रथसप्तमी व्रतोद्यापनं संपूर्ण ॥

माहिती— रथसप्तमी तिथि निर्णय आणि व्रतोद्यापन प्रकार ब्रह्मांड पुराणोक्तानुसार सांगीतलें आहे.

२४७६ प्रा. रथसप्तमी व्रतोद्यापनं अनाम

सं. अ. नं. १४ वर्ग. क्र. अं. ५

बर्नेल. नं. ८२६५ पानें ४

अनु. क्र. अं. ३३ ग्रंथसंख्या ६५

आरंभ — आतां उद्यापन प्रकार सांगीज तो ॥

सेवट — ॥ इति श्री ब्रह्मांड पुराणे रथसप्तमी व्रतोद्यापनं ॥

माहिती— उद्यापन विधि समग्रहीं मराठींत सांगीतलें आहे.

२४७७ महाशिवरात्री निर्णय अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. ६

बर्नेल. नं. ८२७५ पानें ४

अनु. क्र. अं. ३४ ग्रंथसंख्या ७०

आरंभ — अथ महाशिवरात्री निर्णय ते साच प्रादोषार्धरात्रौभयव्यापिनी ग्राह्या.

सेवट — याप्रकारें महाशिवरात्री निर्णय ॥

माहिती— संस्कृत आधार श्लोकांस अर्थ मराठींत सांगीतलें आहे.

२४७८ रथसप्तमीव्रत कथा अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. ७

बर्नेल. नं. ८३०६-C पानें ३

अनु. क्र. अं. ३५ ग्रंथसंख्या ६५

माहिती— पत्रसंख्या ४ पासून ६ पर्यंत आहे. तर सेवट पत्रावर पत्र संख्या ६ ह्मणून दिलें आहे. भविष्योत्तर पुराणांतील कथा.

२४७९ रथसप्तमीव्रत अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं ८

बर्नेल. नं — पानें १

अनु. क्र. अं. ३६ ग्रंथसंख्या १६

माहिती— रथसप्तमीचे दिवसीं करायाचे स्नानप्रकार सांगीतलें आहे.

२४८० श्री गोपालकृष्णपूजाप्रकार		अनाम

सं. अ. नं. १४		वर्ग. क्र. अं. ९

बनॅल. नं. ८३०६(a)		पानें ६

अनु. क्र. अं. ३७		ग्रंथसंख्या ८५

आरंभ — गोकुलाष्टमीव्रत श्री कृष्ण पूजा ।।

सेवट — परिवारसहित श्री बालकृष्ण-प्रियतां ह्मणून मंत्राक्षता पाणी सोडावें ।।

माहिती— ग्रंथ शिथिल आहे.

२४८१ श्री कृष्णपूजा		अनाम

सं. अरा. नं. १४		वर्ग. क्र. अं. १०

बनॅल. नं ८३०६(k)		पानें ७

अनु. क्र. अं. ३८		ग्रंथसंख्या ७५

आरंभ — गोकुलाष्टमी व्रत. श्री कृष्ण पूजा.

सेवट — परिवारसहित श्री वालकृष्ण प्रियतां ह्मणून मंत्राक्षता पाणी सोडावें.

२४८२ जन्माष्टमीव्रत		अनाम

सं. अग. नं. १४		वर्ग. क्र. अं. ११

बनॅल. नं. —		पानें २०

अनु. क्र. अं ३९		ग्रंथसंख्या ९०

आरंभ — व्रतकालनिर्णय.

सेवट — प्रतिमा पूजा.

माहिती— जन्माष्टमी तिथि निर्णय, व्रत काल निर्णय, उद्यापन काल निर्णय व कृष्ण प्रतिमेची पूजाप्रकारहीं सांगीतलें आहे.

२४८३ महाशिवरात्री व्रतोद्यापन अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. १२

बर्नेल. नं. — पानें २

अनु. क्र. अं. ४० ग्रंथसंख्या २५

आरंभ — अथ महाशिवरात्री व्रतारंभ काल उद्यापन कालश्च ॥

सेवट — बारा वर्षं अथवा चोवीस वर्षं करूये

माहिती— महाशिवरात्री व्रतोद्यापन काल निर्णय केलें आहे.

२४८४ महाशिवरात्री व्रत अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. १३

बर्नेल. नं. — पानें ७

अनु. क्र. अं ४१ ग्रंथसंख्या २४५

माहिती— ईश्वर पार्वतीस सांगीतलेले स्कांदपुराणोक्त शिवरात्री कथा.

२४८५ महाशिवरात्री व्रत उद्यापन अनाम

सं. अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. १४

बर्नेल. नं. – पानें ३

अनु. क्र. अं. ४२ ग्रंथसंख्या ५०

माहिती— ईश्वर पार्वतीस सांगीतलेले शिवरात्री व्रतोद्यापन कथा (स्कांद)

२४८६ सोमवती पूजा सहित सार्थकथा श्रीधर गोंधळेकर

अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. १५

बर्नेल. नं. – पानें १३

अनु. क्र. अं. २७७ ग्रंथसंख्या छापी

माहिती— जगद्धितेच्छु छापखाना, पुणें तारीख १६ जानुअरी सन् १८८२. फार जीर्ण पुस्तक.

२४८७ पार्थिवलिंग पूजा अनाम

सं अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. १६

बर्नेल. नं. — पानें ३

अनु. क्र. अं २८६ ग्रंथसंख्या ६२

माहिती— पूजा पद्धती ।। सेवटच्या पानांत - श्रीमन्महाराज विद्वत्सभा मंडित श्री तुळजाराजस्य पुस्तकं.

२४८८ पूजा विधि अनाम

सं. अरा. नं अमानत् वर्ग. क्र. अं. १७

बर्नेल. नं. — पानें ४

अनु. क्र. अं. २८८ ग्रंथसंख्या ३२

माहिती— अपूर्त.

२४८९ यमुना पूजा अनाम

अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. १८

बर्नेल. नं. — पानें २

अनु. क्र. अं. २८९ ग्रंथसंख्या १८

माहिती— अपूर्ण.

२४९० संकटहर पूजा व कथा अनाम

अरा. नं. श्री गोपाळकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ५६ पूजा पानें १-२९.
कथा पानें १-२७.

अनु. क्र. अं. १६० ग्रंथसंख्या छापी

वर्ग. क्र. अं. १९

आरंभ — पूजा आरंभ

सेवट — महाराजस्य सीघ्रमेव साम्राज्य सिद्धिरस्तु ॥ कथा ॥

२४९१ दीपक्रम अनाम

अरा. नं श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

अनु. क्र. अं. १७१ पानें २

वर्ग. क्र. अं. २० ग्रंथसंख्या १३

आरंभ — सौवर्ण पुष्प देवा अर्पुनीयां दक्षिणा त्या उपरी ॥

सेवट — श्री विजयीश्वर पुरवी भक्तानें चिंतिलें मनीं जें जें ॥ १० ॥

२४९२ पूजाक्रम अनाम

अरा. नं. श्री गोपाळकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

वर्नेल नं — पानें ५

अनु. क्र. अं. १७२ ग्रंथसंख्या ५०

वर्ग. क्र. अं. २१

आरंभ — श्रीमंत छत्रपती क्षत्रिय कुल सार्वभौम शिवनृपती ।।

सेवट — नैवेद्य क्रम कथिला वहु जागृतीनें मनांत राखावा.

माहिती— पानें १- ।।

जो विजयी शिवनृपती सुभक्त विजयीश्वराख्य देवाचा ।।
अर्ची अमित द्रव्यीं तें जो निरखिल तोचि दैवाचा ।। ३ ।।

श्री शिवभूप कृत श्री विजयीश्वराच्या पूजा सामग्रीचा वयाज व क्रम ।। ४-४५.

२४९३ फलाभिषेक क्रम अनाम

अरा. नं. श्री गोपाळकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

अनु. क्र. अं. १७३ पानें २

वर्ग. क्र. अं. २२ ग्रंथसंख्या २४

आरंभ — होतां अभिषेक बृहज्जंबीरी आचमनहीं त्या उपरी ।। अर्पोनी कमरकादिक सतावीसहीं फलाभिषेक करीं ।। १ ।।

सेवट — श्री विजयीश्वर भजकां देउनी विजयासी नित्य सांभाळी ।।
पुरतील काम सकलहीं वाढे यश न माये आभाळीं ।।

माहिती— श्री शिवभूप कृत पूजेंत फलाभिषेकाची वयाज.

२४९४ चतुष्षष्ट्युपचारकारिका अनाम

अरा. नं. श्री गोपाळकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बर्नेल. नं. —  पानें २

अनु. क्र. अं. १७४  ग्रंथसंख्या २५

वर्ग. क्र. अं. २३

आरंभ — ।। उत्तरनीरांजन तें विरचुनी करवोनी आचमन उपरी ।।
चौसष्टयहीं उपचार श्री विजयीशासी भक्तियुक्त करीं ।। १ ।।

सेवट — चौसष्टयहीं उपचार श्रीवागीशासी करूनी भावानें ।।
लाहे चौसष्टय कला श्री शिवभूपाल तत्प्रभावानें ।। २१ ।।

माहिती— श्रीशिवभूप कृत पूजेंत चौसष्टय उपचार प्रकार.

२४९५ दर्शन विधी  अनाम

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी

बर्नेल. नं. —  पानें ९

अनु. क्र. अं. १७५  ग्रंथसंख्या १२५

वर्ग. क्र. अं. २४

आरंभ — अनंतर दर्शन विधी ।। राजानें विनीत वेषहोवून ।। सभेमधे
वरवें बसून ।। अथवा हो उभा राहून ।। मन समाधान करूनीयां

सेवट — जो धर्मकडुनी या प्रकारें ।। वेव्हार पाहतो नरवर ।। तो धर्म
अर्थकीर्ती थोर ।। लाभे निरंतर सुखेंकडुनी ।। ९२ ।।

माहिती— आरंभीं "अनंतरदर्शन विधी" असें आहे व सेवटी व्यवहार
कांडीं सातवे ।। प्रकर्ण संपूर्ण बरवे ।। दर्शन विधी ह्मणुनी नावें ।।
असे श्री शिवप्रसादानें ।। ह्मणून आहे.

२४९६ वटसावित्रीव्रत निर्णय अनाम

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बनैल. नं. — पानें १

अनु. क्र. अं. १७७ ग्रंथसंख्या २८

वर्ग. क्र. अं. २५

२४९७ अनंतचतुर्दशीव्रत कथा श्री प्रतापसिंव्ह नृपती

अरा. नं. श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

बनैल. नं. — पानें २०

अनु. क्र. अं. १९१ ग्रंथसंख्या २७५

वर्ग. क्र. अ. २६

आरंभ — ॐ नमो जी दयाणवा करितुंडा ।। मोदकसीं धरिती सर शुंडा ।। विघ्नाळागी करीतां तूं दंडा ।। पापचंडा हरीसी ।। १ ।।

सेवट — इतुकेनी कथा पावली समाप्तीसी ।। ह्मणोनी श्रीकृष्ण सांगे युधिष्टिरासी ।। सूत निरूपी नैमिष वनवासीयांसी ।। ऋषी जनांसी तापहर ।। ९९ ।।

माहिती— पत्रें २०-ह्मणूनी अमरेंद्र भूपतीया तनय ।। प्रतापसिंव्ह नृप जोडोनी करद्वय ।। श्रोतयांसी विनवी कथा रसमय ।। पातक लय कर्ती जें कां ।। १०० ।।

मुखपत्रावर-हे प्रति रामस्वामी शिर्के यांस दिली असे.

२४९८ श्री गणेशोद्यापन स्कंदपुराणोक्त

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बंडल नं –  पानें ११

अनु. क्र. अं. २२२  ग्रंथसंख्या १२५

वर्ग. क्र. अं. २७

माहिती— मूळ संस्कृत श्लोकांसहित.



॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे अनुबन्ध

वर्ग—८.

धमशास्त्र

नंबर २४९९ — २५०१.

२४९९ धर्म सुबोधिनी नारायण

सं. अ. नं. ५१ वर्ग. क्र. अं. १

बंडल. नं. २२८ पानें २८

अनु. क्र. अं. १ ग्रंथसंख्या ९५५

आरंभ — जयति जगति देव: शंकर: पार्वतीशो निखिल निगम तत्वं योगि हृद्रम्यमूर्ति: ॥

सवट — वरदराजीय ग्रंथांतर जे ते शुद्ध ह्मणूनहीं मिथ्यासहचरित ह्मणूनहीं दोनी प्रकारचे आहे ह्मणून सांगीतलें आहे.

माहिती— मनु, नारद, याज्ञवल्क्यादि, विज्ञानेश्वर, माधव, मयूख इत्यादिकांचा मतानुसारहीं, स्मृतिचंद्रिकानुसारहीं धर्म परिपालन करणारे व्यवहार विचार करावयाची पद्धती सांगीतलें आहे (१) व्यवहार स्वरूप, (२) सभा निरूपण, (३) न्यायाधीश, (४) प्राड्विवाक,

(५) मंत्री, (६) पुरोहित (७) सभ्य, (८) गणक, (९) लेखक. यांचा स्वरूप सांगीतलें आहे. व्यवहारानुसार न्याय निर्णयाची पद्धतीहीं सांगीतलें आहे.

२५०० धर्मसिंधू - मराठी भाषांतर. कमलाकर भट्ट

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ७९६

अनु. क्र. अं. १६६ छापी

वर्ग. क्र. अं. २

२५०१ वृद्धचाणाख्य सटीक अनाम

अरा. नं. अमानत वर्ग. क्र. अं. ३

बर्नेल. नं. — पानें ४५

अनु. क्र. अं. २५८ ग्रंथसंख्या ९००

आरंभ — प्रथोमोध्याय – श्लोक ॥ वृद्धचाणाख्य ग्रंथस्य टीकां कुर्वे सुबोधनीं ॥ सर्वलोकोपकाराय भाषया महाराष्ट्रया ॥

सेवट — नवमोध्याय- अपूर्त.

माहिती— पानें २ तें १२. लावण्या. शरभेंद्र त्रिस्थळी यात्राचे लावण्या.

पानें १४ ते ४६. वृद्ध चाणाख्य शास्त्र. आठ अध्याय.

पानें १ नाहीं इतर पानें कोरी.

नवम अध्यायांत ४ श्लोकच आहेत. मूल संस्कृत श्लोकांस महाराष्ट्र भाषेंत अर्थ दिलें आहे.

॥ श्रीः ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे

## अनुबन्ध

### वर्ग—९.

### कहाणीकथा

नंबर २५०२ — २५०९.

२५०२ वेताळ पंचवीसी शिवदास

सं अरा. नं. १४ वर्ग. क्र. अं. १

बर्नेल. नं. १३८८८ पानें १००

अनु. क्र. अं. ४९ ग्रंथसंख्या १९७७

आरंभ — वेताळ पंचवीसी ॥ कथा सांगेन सुरसी ॥
जें मूढांसी ॥ ज्ञान होय जाणा ॥

सेवट — जैसें विक्रमु लाधला ॥ तो राजा करूं लागला ॥
इति श्री वेताळ पंचवीसी ॥ कथन शिवदासी ॥
प्रसंग ॥ २६ ॥ समाप्त ॥ श्री सदाशिवार्पणमस्तु ॥

माहिती— ग्रंथ अति जीर्ण आहे. अक्षरें स्पष्ट नाहींत. मुखपत्र दिसत नाहीं तर कथा समग्र आहेत.

२५०३ ऋषीपंचमी कथा प्राकृत (ओवी) श्री प्रतापसिंव्ह नृपती

अग. नं. श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें २०

अनु. क्र. अं. १९२ ग्रंथसंख्या २२०

वर्ग. क्र. अं. २

आरंभ — ।। ॐ नमो जी करींद्रवंदना सुन्दरा ।। कपिला सकळ विद्ये-
चीया माहेरा ।। मोदकप्रिया सर्व सुबुद्धी दातारा ।। गुणाकरा
विश्ववंद्या ।। १ ।।

सेवट — ।। ह्मणोनी ब्रह्मा सांगे श्वेताश्वासी ।। सूत निरोपी शौनकादिकांसी
।। जे राहणार नैमिषप्रदेशीं ।। कथा तयांसी दोषहर ।। २४ ।।

माहिती— या ग्रंथांत ऋषीपंचमीव्रत कथा व व्रतोद्यापन कथा दोनी आहेत
।। ह्मणोनी अमरेन्द्र भूपती पुत्र ।। प्रतापसिंव्ह नृप श्रोत्यां पवित्र
।। विनवी विनयें कथेचें सूत्र ।। पाप सर्वत्र नाशावया ।। २६ ।।
हे प्रति रामस्वामी शिंके यांस दिली असें

२५०४ श्री केदारव्रत कथा प्राकृत. (ओवी)
श्री प्रतापसिंव्ह नृपती

अग. नं. श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें २२

अनु. क्र. अं. १९३ ग्रंथसंख्या ३५०

वर्ग. क्र. अं. ३

आरंभ — ।। ॐ नमो जी गजमुखा विद्याधरा ।। भक्तवत्सला दयासिंधो
विघ्नहरा ।। नागकटबंधना गौरीकुमरा ।। परात्परा विश्वबंद्या ।। १ ।।

सेवट —— ॥ प्रसिद्ध जे कां नैमिष अटवी ॥ तीमाजी वसे ऋषी तती आघवी ॥ तिजलागी सूत कथें तें विनवी ॥ जे मुकवी दुरित पटला ॥ २१२ ॥

माहिती—— पत्रें-२२. ॥ ह्मणूनी अमरेंद्र नृप तनय ॥ प्रतापसिंव्ह नृपती करद्वय ॥ जोडोनी श्रोतयां कथा रसमय ॥ विनवी युक्त विनय होउनी ॥ हे प्रति रामस्वामी शिके यांस दिली असे ॥

२५०५ श्री ज्येष्ठाकनिष्ठाव्रत कथा. (वोवी) नाग

अर्ग. नं. श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ३१

अनु. क्र. अं. १९४ ग्रंथसंख्या ४५०

वर्ग. क्र. अं. ४

आरंभ —— ॥ ॐ नमो जी विघ्नहरा विनायका ॥ वेदवेद्या भक्ताभीष्टफलदायका ॥ नमन पावो माझे तुज सुमुखा ॥ तूंचि सकळिकां स्फूर्ति देता ॥ १ ॥

सेवट —— ॥ स्कंदपुराण भविष्योत्तरपुराण ॥ या दोनींतलीहीं कथा मिळउन ॥ यथामती सांगीतली शास्त्रेकडून ॥ जाणोत सज्ञान श्रोतेजन ॥

माहिती—— काल :- पानें-३१. शंके सवाशें अठ्ठेताळे व्ययवर्ष ॥ कृष्ण एकादशी मास मार्गशीर्ष ॥ सोमवासर निशिदिनीं एक तास ॥ ग्रंथ समाप्तीस पावला तें ॥

कर्ता :- पानें-३१. ह्मणोनी श्रोते जे कां अति सज्ञान ॥ तयां-प्रति अत्यंत विनयाचेन ॥ करी विनवणी कर जोडुन ॥ नाग नाम्न शिवात्मज ॥

मुखपत्रावर- हे प्रति रामस्वामी शिर्के यांस दिली असें आहे.

२५०६ वटसावित्रीव्रत कथा (वोवी) माधव

अरा. नं. श्री नागास्वामी शिर्केराव यांची देणगी.

बर्नेल. नं. – पानें २१

अनु. क्र. अं. १९५ ग्रंथसंख्या ३५०

वर्ग. क्र. अं. ५

आरंभ — ॥ मार्कंडेयानें समाधान ॥ केलीयावरी पंडुनंदन ॥
॥ बोलता झाला कर जोडन ॥ ह्मणे वचन अवधारा ॥ १ ॥

सेवट — ॥ हे इतिहास पुराण कथा ॥ श्रवणें पातकें जाती दिगंता ॥
॥ धन संततीं आरोग्य प्राप्तता ॥ नारी सौभाग्यता लाधती ॥

माहिती— कर्ता:- ॥ इच्छिल्यामन कामना पुरती ॥ ह्मणोनी ऋषी सांगे धर्माप्रती ॥ येर दोषे दोषांसी कथिती ॥ कथा दोषहर्ता माधव ह्मणे ॥ इति श्री महाभारते आरण्य पर्वणी सावित्र्युपाख्याने भर्तृयोगोनाम षोडषशततमोध्याय: ॥

मुखपत्रावर - हे प्रति रामस्वामी शिर्के यांस दिली असे आहे.

२५०७ श्री वरमहालक्ष्मी कथा श्री प्रतापसिंव्हनृपती.

अरा. नं. श्री नागास्वामी शिर्केराव यांची देणगी.

बर्नेल नं — पानें ६

अनु. क्र. अं. १९६ ग्रंथसंख्या १०५

वर्ग. क्र. अं. ६

आरंभ — ॥ ॐ नमोजी स्वामी तुझेनी विघ्न झडे ॥ तव नामवातें नासती विघ्न मेहुडे ॥ तव दासां करी नवनिधि आतुडे ॥ पाडिसी कडे संकटाहुनी ॥ १ ॥

सेवट — ।। हिमवत्तबोळ या व्रता तें यासाटीं ।। तूंहीं आचरीं भक्ती पोटीं ।। ऐशी शंकराची ऐकोनी गोटी ।। मग धूर्जटिप्रिया करितीं झाली ।। ५६ ।।

माहिती— कर्ता :- पानें-६.

।। ह्मणूनीसूत सांगे मुनीजनांसी ।। अमरेंद्र नृपसुत श्रोतयांसी ।। ।। प्रतापसिंव्ह नृप करसारसीं ।। वंदूनी कथेसी विनवी ।।

।। इति श्री भविष्योत्तरपुराणें वरमहालक्ष्मीव्रत कथा संपूर्ण मस्तु ।। सेवटच्या पत्रावर - हे प्रती रामस्वामी शिर्के यांसी असें आहे.

२५०८ हरितालिकाव्रत कथा (वोवी) प्रतापसिंव्ह

अश. नं श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

बंनेल. नं. — पानें २६

अनु. क्र. अं. १९७ ग्रंथसंख्या २७५

वर्ग. क्र. अं. ७

आरंभ — ।। ॐ नमो जी विघ्नहरा विकटा ।। स्मरणचि हरिसी तूं नाना संकटा ।। अघ येऊंनेदिसी भक्तांनिकटा ।। पदीं वाजठा भूषा शोभती ।। १ ।।

सेवट — ।। ह्मणोनीयां सूत पुराणिक ।। शौनकादिकांप्रती आलोलिक ।। ।। कथा सांगता जाहला सम्यक ।। पाप सकळिक नासाया ।।

माहिती— या ग्रंथांत हरितालिका व्रत कथा व उद्यापनें विधी दोनी आहेत कर्ता :- पानें २४- ।। ह्मणोनी अमरेंद्र भूपती सुत ।। प्रताप सिंव्ह भूप वदे हे पूत ।। कथा ऐका होवोनी सावचित्त ।। दोष समस्त हराया ।।

मुख पत्रावर - हे प्रति रामस्वामी शिर्के यांस दिली असें आहे

२५०९ सुभाषित कहाण्या (अपूर्ण) अनाम

अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ८

बंडल. नं. — पानें १४४

अनु. क्र. अं २५९ ग्रंथसंख्या २१६०

माहिती— पानें ३० पासून आरंभ. कहाणी १७ चे नंतरचे मात्र आहे.
कुल्ल काहाण्या १०८स १७ जातां उरलेले काहाण्या ९१.
प्रत्येक काहाणीस गर्भित अर्थ आणि संस्कृत श्लोकहीं दिलें आहे.
अजुन काहीं काहाण्या असावेत असा भास होतो.



॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे

# अनुबन्ध

## वर्ग–१०.

## इतिहास

नंबर २५१० — २५१८.

२५१०। श्री शरभेंद्र शिवधर्म वासुदेव

स. अ. नं. १९ वर्ग. क्र. अं. १

बर्नेल. नं. १३९९२ पानें १८

अनु. क्र. अं. ७३ ग्रंथसंख्या २७५

आरंभ — ×× विघ्न निकरा पळवी जो

सेवट — ॥ श्री सांबमूर्तीच्या दयेनें ॥ धुंडीराज भट्टाच्या सुतानें ॥ हा ग्रंथ केला परिपूर्ण ॥ आठा दिवसानें श्री शिव ॥ ५१ ॥
इति श्री शरभेंद्र शिवधर्मे चतुर्थोध्याय: ॥

माहिती — हा ग्रंथ अति जीर्ण असून पानें आपो आप झडतात. ह्यांतील च्यारी अध्यायांत प्रथमोध्याय श्री शरभेंद्रानें बृहदीश्वराचे आलयीं केलेले शिवलिंग प्रतिष्टे विषयींहीं दुसरे व तिसरे अध्यायांत श्रीरंग यात्रा विषयींहीं आणि अध्याय चौथ्यांत

अखण्ड कावेरी यात्रा व श्री जंबुलिंगाचे दर्शनाविषयींहीं सांगीतले आहे. ग्रंथाच्या समाप्तींत काहीं वोव्या नाहींत. तरी पण यात्रावर्णन पूर्ण आहे.

२५११ श्री शरभेंद्रतीर्थयात्रा अनाम

सं· अरा. नं. १९ वर्ग. क्र. अं. २

बंडेल. नं १३९९६ पानें ३७

अनु. क्र. अं. ७४ ग्रंथसंख्या ५६०

माहिती— अपूर्ण ॥ ३७ पानेंच आहेत. आरंभ आणि शेवट दोनींहीं कळत नाहीं.

२५१२ महाराष्ट्र देशाची जंत्री अनाम

अरा. नं अमानत् वर्ग. क्र. अं. ३

बंडेल. नं. — पानें १२

अनु. क्र. अं. १३६ ग्रंथसंख्या छापी

माहिती— या छापी पुस्तकाचा कर्ता व प्रकाशक, छापखाना काहीं कळत नाहीं. या पुस्तकांत महाराष्ट्र इतिहासांत ध्यानांत ठेवण्या सारख्या गोष्टी पुष्कळ आहेत.

२५१३ महाल, कारखान्यांची बयाज अनाम

अरा. नं. अमानत् वर्ग. क्र. अं. ४

बंडेल. नं. — पानें ९ बंद

अनु. क्र. अं. १३७ ग्रंथसंख्या २५

माहिती— तंजावरचे वागणींतले अठराकारखाना आणि बारा महाल यांचीं नांवें.

२५१४ प्राकृत कादंबरी अनाम

अरा. नं श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बर्नेल. अं. — पानें २०

अनु. क्र. अं. १७८ ग्रंथसंख्या १९५

वर्ग. क्र. अं. ५

आरंभ — ।। विघ्नेशाघ्रिसरोरुहाचे ।। मकरंद बिंदु जानें वाचे ।।
।। सेविजेले वाग्वल्लीचे ।। पल्लव त्याचे विस्तार होती ।। १ ।।

सेवट — ।। हे शिव वाणी ऐसें जाणा ।। करा नळ कथेच्या श्रवणा ।।
।। तेणें पूर्ण होतील कामना ।। श्रोते जना माझी विनंती ।।

माहिती— प्राकृत कादंबरी - नैषध मंजरी स्तवक ५.

पानें-२. ।। वोवी ।। या कारणें नळ चरित्र ।। कवीनें केलें महा पवित्र ।। साहित्य प्रगटावया विचित्र ।। सुजन श्रोत सुखदायक ।। पानें-२०. ।। साधारणेधिकाषाढे शुक्ले नामिके तिथौ ।। आदित्य हस्ते संपूर्ण चरित्रं सुर्यकंत्रवत् ।।

२५१५ तुकाराम चरित्र (वोवी) श्री सोमनाथ

अरा. नं. श्री नागासामी शिर्केराव यांची देणगी.

बर्नेल नं — पानें १५८

अनु. क्र. अं. १९८ ग्रंथसंख्या १६७५

वर्ग. क्र. अं. ६

माहिती— अपूर्ण ॥ अध्याय २ ते २५ व २७ आणि २८ आहेत.
अध्याय १ आणि २६ नाहींत.
प्रत्येक अध्यायाचे सेवटी - श्री तुकाराम विजय ग्रंथ ॥
ऐकतां पूर्ण होती मनोरथ ॥ ऐसें क्ष्माप तनुज श्रीसोमनाथ ॥
दृढ भावार्थे विनवितसे ॥

२५१६ श्री शरभेंद्रतीर्थयात्रा घुंडीराजभट्टसुत

अरा. नं. श्री जयसिंगराव जाधव यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें १०२

अनु. क्र. अं. २३० ग्रंथसंख्या १३००

वर्ग. क्र. अं. ७

आरंभ — श्री गणेश शारदा स्तवनानंतर श्लोक :- वंदु श्री गणराज
विघ्नहर जो सिंदूर पंकाचीया ॥ × × × × ॥

सेवट — ॥ श्री सांबमूर्तीच्या दयेनें ॥ घुंढिराज भट्टाच्या सुतानें ॥
॥ हा ग्रंथ केला परिपूर्ण ॥ आठां दिवसानें श्री शिवें ॥

माहिती— हे ग्रंथ. टो. क्रं. अं. १५८९ ची दुसरी प्रति आहे.
उत्तम प्रति. इतर माहिती १५८९ प्रमाणें.

२५१७ चितूर गडाचा वेढा नागेशराव विनायक बापट

सं. अरा. नं. श्री महादेवराव घाडगे यांची देणगी. अरा-९.

बर्नेल. नं. — पानें ५२

अनु. क्र. अं. ३३६ ग्रंथसंख्या छापी

वर्ग. क्र. अं. ८

माहिती— प्रकाशक :- तुकाराम जावजी. मुंबई. इ. स. १९०४.
किमत ७ आणे. चरित्रकाल इ. स. १५६७.
रजपूतांचा वर्णनीय गुण. स्वातंत्र्याभिमान
असा वृत्तांत व लढाईचे वर्णन दिले आहे.

२५१८ इंग्लंडाचा प्रश्नोत्तर रूप इतिहास

रामचंद्र विनायक रणजित

अग. नं. श्री महादेवराव घाडगे यांची देणगी. अग-९.

बर्नेल. नं — पानें ५१

अनु. क्र. अं. ३४१ ग्रंथसंख्या छापी

वर्ग. क्र. अं. ९

माहिती— प्रकाशक :- रामचंद्र विनायक रणजित, मुंबई, इ. स. १८७०
किंमत ३ आणे, इंग्लंड देशाचा. १८५४ तागाईतचा इतिहास

॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे अनुबन्ध

## वर्ग–११.

## निघण्टु

नंबर २५१९ — २५४१.

२५१९ अमर पहिलें काण्ड. (सव्याख्यान) अमरसिंह

रु/. अरा. नं. १९ वर्ग. क्र. अं. १

बर्नेल. नं. ५५८३-व पानें ८६

अनु. क्र. अं. ९ ग्रंथसंख्या १००३

आरंभ –– स्वर्ग वर्ग.

सेवट — वारि वर्ग.

माहिती— मुखपत्रावरून हे पुस्तक श्री तुलजा महाराजांची ह्मणून कळूं येतें वर्गासहीं मराठी टीका आहे-ह्या पहिलें काण्डांत स्वर्ग एकेक वर्ग-(१) व्योम वर्ग-(२) दिग्वर्ग-(३) शब्दादि वर्ग-(४) नाट्य वर्ग-(५) पाताळ वर्ग-(६) भोगिवर्ग-(७) नरक वर्ग-(८) वारि वर्ग-(९). ऐसें ९ वर्ग आहेत.

२५२० अमरे दुसरे काण्ड. (सव्याख्यान) अमरसिंव्ह

सं. अरा. नं. १९ वर्ग. क्र. अं. २

बंडल. नं. ५५८३b पानें १९८

अनु. क्र. अं. १० ग्रंथसंख्या २७४०

आरंभ — भुवर्ग.

सेवट — शूद्र वर्ग.

माहिती— मुख पत्रावरून श्री तुळजामहाराजांची पुस्तक ह्मणून कळूं येतें ह्या दुसऱ्या काण्डांत भू वर्ग (१) पुर वर्ग (२) शैल वर्ग (३) वनौषधी वर्ग (४) सिंव्हादि वर्ग (५) मनुष्य वर्ग (६) ब्रह्म वर्ग (७) क्षत्रिय वर्ग (८) वैश्य वर्ग (९) शूद्र वर्ग (१०). ऐसे दाहा वर्गांसहीं मराठी टीका आहे. ग्रंथ अति शिथिल आहे.

२५२१ अमर तृतीय काण्ड (सव्याख्यान) अमरसिंव्ह

सं. अरा. नं. १९ वर्ग. क्र. अं. ३

बंडल. नं. ५५८३c पानें ७२

अनु. क्र. अं. ११ ग्रंथसंख्या १०५५

माहिती— संकीर्ण वर्ग (१) नानार्थ वर्ग (२) ऐसे दोनी वर्गांसहीं मराठी टीका आहे. पत्र संख्या २४ पासून आरंभ करून, सेवट पत्र ९५ असें दिलें आहे. एकून पत्र संख्या ७२ होय. ग्रंथ अति शिथिल आहे.

२५२२ अमर प्रथमकाण्ड टीकासह श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २० वर्ग, क्र. अं. ४

वर्नेल. नं. ५५८४(b) पानें ७७

अनु. क्र. अं १२ ग्रंथसंख्या मू. ग्र. ३०३. व्याख्यान ग्रथ ७००. एकून ग्र. १००३.

आरंभ — स्वर्ग वर्ग.

सेवट — वारि वर्ग.

इत्यमरसिंव्ह कृतौनामलिंगानुशासने स्वर्गादिः प्रथमकाण्ड. सांग एव समर्थितः ॥

माहिती— वर्ग नवासहीं मराठी टीका आहे. ह्या प्रथमकाण्डांत स्वर्व्योम दिक् शब्द नाट्य पाताळ भोगि नरक वारी असे ९ वर्ग आहेत ग्रंथ सुन्दर आहे.

२५२३ अमर द्वितीयकाण्ड टीकासह श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २० वर्ग. क्र. अं ५

वर्नेल. नं. ५५८४(b) पानें १९६

अनु. क्र. अं. १३ ग्रंथसंख्या २७४०

आरंभ — भू वर्ग.

सेवट — शूद्र वर्ग.

माहिती— ह्या दुसऱ्या काण्डांत भू वर्ग, पुर वर्ग, शैल वर्ग. वनौषधी वर्ग सिंव्हादि वर्ग, मनुष्य वर्ग, ब्रह्म वर्ग, क्षत्रिय वर्ग, वैश्य वर्ग, शूद्र वर्ग, असे वर्ग दाह्यासहीं मराठी टीका आहे. ग्रंथ शिथिल आहे.

20

२५२४ अमर द्वितीयकाण्ड, प्राकृत टीकासह श्री अमरसिंह

सं. अरा. नं. २० वर्ग. क्र. अं. ६

बर्नेल. नं. ५५८५ पानें २०८

अनु. क्र. अं १४ ग्रंथसंख्या २७४०

आरंभ — भू वर्ग.

सेवट — शूद्र वर्ग.

माहिती— भू वर्गादि दाहा वर्गांसहीं मराठी टीका आहे.

२५२५ अमर सटीक तृतीयकाण्ड श्री अमरसिंह

सं. अरा. नं. २० वर्ग. क्र. अं. ७

बर्नेल. नं. ५५८६ पानें ११३

अनु. क्र. अं. १५ ग्रंथसंख्या १२३५

आरंभ — विशेष्य निघ्न वर्ग.

सेवट — अव्यय वर्ग.

माहिती— मुख पत्र तुटलेली आहे. आद्यन्त पत्रावर वेलदारी रंगीत चित्र आहेत. ह्या काण्डांत पहिले श्लोकांत विशेष्य निघ्नैः स्संकीर्णैं नानार्थैरव्ययरपि ॥ लिंगादि संग्रहैर्वर्गाः सा नानार्थ वर्ग संश्रयाः ॥ १ ॥ असें पांच वर्ग सांगीतली असून लिंगादि संग्रह वर्ग ह्या ग्रंथांत दिसत नाहीं.

२५२६ अमर प्रथमकाण्ड सटीक (अपूर्त) श्री अमरसिंह

सं अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. ८

बर्नेल. नं. ५५८७(a) पानें ३६

अनु. क्र. अं. १६ ग्रंथसंख्या ४८६

आरंभ — स्वर्ग वर्ग.

सेवट — शब्दादि वर्गांत १० श्लोक.

माहिती— प्रथमकाण्डांत दिग्वर्ग पावेतो पूर्त आहे. प्रथम काण्डांतील इतर वर्ग नाहींत.

२५२७ अमर द्वितीयकाण्ड प्राकृत व्याख्यासह (अपूर्त)

श्री अमरसिंव्ह

सं. अ. नं. २१ वर्ग. क्र. अं. ९

बर्नेल. नं. ५५८७(b) पानें ४०

अनु. क्र. अं. १७ ग्रंथसंख्या ५०३

आरंभ — भू वर्ग.

सेवट — वनौषधी वर्गांत ८६ श्लोक

माहिती— मुख पत्रावर दौलतीची पोथी ह्मणून लिहिलें आहे.
भू, पुर, शैल हे तीनी वर्ग पूर्न असून चवथें वनौषधी वर्ग अपूर्त आहे.

२५२८ अमर द्वितीयकाण्ड प्राकृत व्याख्यानासह (अपूर्त)

श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १०

बंनेल. नं. ५५८७ (b-2) पानें ८९

अनु. क्र. अं. १८ ग्रंथसंख्या १३८३

आरंभ — भू वर्ग.

सेवट — मनुष्य वर्गांत "परिवेत्तानुजोन्ढो ज्येष्ठेदार परिग्रहात्" पर्यन्त.

माहिती— ह्या काण्डांत दाहा वर्ग असावेत. पण ५ वर्ग पूर्त असून मनुष्य वर्ग अपूर्त आहे. अक्षरें सुन्दर आहेत.

२५२९ अमर तृतीयकाण्ड प्राकृत व्याख्यासह (अपूर्त)

श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. ११

बंनेल. नं. ५५८७ (c) पानें. ४४

अनु. क्र. अं. १९ ग्रंथसंख्या ५१६

आरंभ — विशेष्य निघ्न वर्ग.

सेवट — संकीर्ण वर्गांत ४१ श्लोक.

माहिती— ह्या काण्डांत पांच वर्ग असावेत. पण विशेष्य निघ्न वर्ग पूर्त असून संकीर्ण वर्गच अपूर्त आहे.

२५३० अमर तृतीयकाण्ड परियाय शब्द श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १२

बंनेल. नं. ५५८८ पानें बंद १७७स कमी हाजर १६० बंद आहेत

अनु. क्र. अं. २० ग्रंथसंख्या ३५०

माहिती— विशेष्य निघ्न वर्गांतील कितिएक नोंदलेलें मानसांची नांवें.

२५३१ अमर द्वितीयकाण्ड प्राकृत व्याख्यासह (अपूर्त)

श्री अमरसिंव्ह

सं अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १३

बर्नेल. नं. ५५८९ पानें १८

अनु. क्र. अं २१ ग्रंथसंख्या २९४

आरंभ — मू वर्ग.

माहिती— अपूर्त आहे.

२५३२ अमर तृतीयकाण्ड लिंगसंग्रहवर्ग प्रा. व्याख्यासह

श्री प्रतापसिंव्ह नृपती

अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १४

बर्नेल. नं. ५५९० पानें २६

अनु. क्र. अं. २२ ग्रंथसंख्या ३९६

माहिती— लिंग संग्रह वर्गमात्र मराठी टींका सह आहे.

आरंभीं ×××× ॥ १ ॥ प्रतापसिंव्हाख्य तदीय पुत्र पाहुनीयां लौकिक सर्व तंत्रे ॥ तैसीच वैय्याकरणोक्त सूत्र सांगीतला लिंगविधी स्वतंत्र ॥ ह्यावरून हे ग्रंथ श्री तुकोजी राज सुत श्रीप्रतापसिंव्ह भूपानें केलें असें कळून येतें. अक्षर अस्पष्ट आहेत.

२५३३ सटीक अमरकोश प्रथमकाण्ड श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १५

बर्नेल. नं. ५५९१(a) पानें ५३

अनु. क्र. अं. २३ ग्रंथसंख्या ११०३

आरंभ — स्वर्ग वर्ग.

सेवट — वारि वर्ग.

माहिती— आद्यंत पत्रावर वेलदारी रंगीत चित्र आहेत.
ह्या प्रथम काण्डांत स्वर्ग ते वारि पर्यन्त ९ वर्गासहीं मराठी टीका आहे. ग्रंथ सुन्दर आहे.

२५३४ सटीक अमरकोश द्वितीयकाण्ड श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १६

बर्नेल. नं. ५५९१(b) पानें १४२

अनु. क्र. अं. २४ ग्रंथसंख्या २७४०

आरंभ — भू वर्ग.

सेवट — शूद्र वर्ग.

माहिती— आद्यंत पत्रावर वेलदारी रंगीत चित्र आहेत.
ह्या काण्डांत भू वर्ग ते शूद्र वर्ग पर्यन्त १० वर्गासहीं मराठी टीका आहे. ग्रंथ सुन्दर आहे.

२५३५ अमर प्रथमकाण्ड व्याख्यानासह (अपूर्त)
श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १७

बर्नेल. नं. — पानें १०

अनु. क्र. अं. २५ ग्रंथसंख्या ९४

माहिती— अपूर्त. अमर कोश प्रथमकाण्ड.

२५३६ अमरकोश द्वितीयकाण्ड व्याख्यानासह (अपूर्त)

श्री अमरसिंव्ह.

सं. अरा. नं २१ वर्ग. क्र. अं. १८

बर्नेल नं — पानें १५

अनु. क्र. अं. २६ ग्रंथसंख्या १२५

माहिती— अपूर्त. अमरकोश द्वितीयकाण्ड.
पत्र संख्या ४१ असें दिलें आहे. पण पत्र १५च आहेत.

२५३७ अमरकोश तृतीयकाण्ड व्याख्यासह (अपूर्त)

श्री प्रतापसिंव्ह नृपती.

सं अरा. नं. २१ वर्ग. क्र. अं. १९

बर्नेल. नं. — पानें १३

अनु. क्र. अं. २७ ग्रंथसंख्या १३०

माहिती— अपूर्त. अमरकोश. तृतीयकाण्ड.

२५३८ अमरकोश प्रथमकाण्ड सव्याख्यान

श्री अमरसिंव्ह

सं. अरा. नं. ११ वर्ग. क्र. अं. २०

बर्नेल नं १२३४६ पानें ४७

अनु. क्र. अं. ४४ ग्रंथसंख्या १००३

आरंभ — स्वर्ग वर्ग.

सेवट — वारि वर्ग.

माहिती— स्वर्ग वर्ग ते वारि वर्ग पर्यंत ९ वर्गांसहीं मराठी टीका आहे.— मुख पत्र नाहीं.

२५३९ अमरकोश दर्पण अनाम

अरा. नं. श्री जनार्दन बावा यांची देणगी. अरा. नं. १.

बर्नेल. नं. – पानें ३०५

अनु. क्र. अं. १५३ ग्रंथसंख्या ३२५०

वर्ग. क्र. अं. २१

आरंभ — अ: = विष्णु: आकारांत: पुल्लिंग:

सेवट — क्षंता = साहणार रू. पु.

माहिती— पानें-३०५- स्वस्ति श्री नृप शालिवाहन शके १७८६. रक्ताक्षी नाम संवत्सर माघवद्य चतुर्थी भौमवारी श्रीरामचन्द्राच्या प्रसादाकडून पूर्णतेस पावले.
पानें किडे खाल्ले जाऊन फार जीर्ण आहे.

२५४० संस्कृत व प्राकृत कोश. गोडबोले व केळकर

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी.

बर्नेल. नं. — पानें ५०९

अनु. क्र. अं. १६७ ग्रंथसंख्या छापी

वर्ग. क्र. अं. २२

२५३१ मराठी भाषेचा नवीन कोश आर. वी. गोडबोले

अरा. नं. श्री गोपालकृष्ण ढवळेकर यांची देणगी

बर्नेल. नं — पानें ६३२

अनु. क्र. अं. १६८ ग्रंथसंख्या छापी.

वर्ग. क्र. अं. २३



॥ श्री ॥

# तंजावर महाराज शरभोजी यांच्या सरस्वती महाल ग्रंथ संग्रहालयांतील मराठी ग्रंथांची बयाजवार यादीचे

# अनुबन्ध

वर्ग–१२.

ज्योतिष

नंबर २५४२ — २५५३.

२५४२ श्री विजय भैरव

वजीरन्मालीक हा खलूची वंशस्थ जिया दौलत्खानाचा नंदन. श्रीमन्महेंद्राचार्यांचा शिष्य

| | |
|---|---|
| सं अरा. नं. ४ | वर्ग. क्र. अं. १ |
| प्राचीन. नं. ४१९७ | पानें १०७ |
| अनु. क्र. अं ५ | ग्रंथसंख्या १३३५ |

आरंभ — ॥ महेंद्राचार्य परमेश्वराचा प्रसादास्तव सर्वजनांची अज्ञानपण निरसावया ॥ ज्ञान बोध व्हावया बरवीं वाक्य करून विजय भैरव ग्रंथ करितों ॥

सेवट — ॥ इति श्री सकळ विद्या विशारद श्रीमन्महेंद्राचार्य चरणांबुज शिष्य विरचिते विजय भैरव समाप्तः ॥

माहिती— पहिले २ पानें फाटलेली आहेत.

ह्या ग्रंथांत पंचांग, शकुन. अंगस्फुरण इत्यादि लक्षण, भूमि बलादिक, यात्रादि, वृष्टी असे समस्त प्रकरण आणि अवकहडादि चक्रावळी हे सर्व स्पष्टपण चित्रांसह जाणविलें आहे.

२५४३ श्री विजयभरव — वजीरन्मलीक्

| | |
|---|---|
| सं. अरा. नं. ४ | वर्ग. क्र. अं. २ |
| प्राचीन नं ४१९८ | पानें ९३ |
| अनु. क्र. अं. ६ | ग्रंथसंख्या १०५० |

माहिती— अनुबंध क्रमांक ५ ची दुसरी प्रति. चित्र रहित.

२५४४ पवन प्रकाश — मल्हारदास

| | |
|---|---|
| सं. अरा. नं. ४ | वर्ग. क्र. अं. ३ |
| प्राचीन. नं. ४२१७(c) | पानें १५ अति जीण<br>वोव्या २१४ |
| अनु. क्र. अं. ७ | ग्रंथसंख्या १४५ |

आरंभ — आतां नमो गणेश्वरु जो ज्ञानाचा सागरु ।। तो नमिला विघ्नहरु ।। परमानंदु ।।

सेवट — ×××× हे पार्वतीनें अभ्यासिले ।। ×××× उपदेशिले ।। सिद्ध खुख बीज सांगीतले ।। गुरु × × × × ।। श्री उमा महेश्वर संवादे पवन विजय ग्रंथ ।। × × ××× प्रसंग चौथा ।। श्री सच्चिदानंदार्पणमस्तु ।।

